# विराट मानव

( मानव संस्कृतीच्या उत्क्रान्तीवरील एक ओजस्वी खण्डकाव्य )

डॉ. शं. जा. पुरवार, ' कृष्ण '-मित्र
एल्. सी. पी. अँड एस्. ( मुंबई )

कि. १। रुपया ]

[ मे १९४२

# अर्पण



कै. श्रीमान मामाजी सुन्दरलालजी
सराफ, खामगांव (वऱ्हाड)



कै. श्रीमती मामी रतनदेवी
सराफ

यांच्या पवित्र स्मृतीस

## —फुलांमुलांचे कवि—

### डॉ. शङ्करलाल जानकीलाल पुरवार, एल्.सी.पी.एस्. (मुंबई)

### ( 'कृष्ण' मित्र )

## यांचें आगामी प्रकाशन

(१) पूजन:— फुलांमुलांवरील ओजस्वी स्फुट कवितांचा सङ्ग्रह.

"...शिशुंस या प्रथम गीतांतच कवीच्या भव्य कल्पना-शक्तीची एक छोटी सलामी वाचकांस मिळते व भाषेचेंहि माधुर्य प्रतीत होतें..." —दत्तो वामन पोतदार, पुणें

"...मराठी जेथें प्राचीन कालीं फुलली तेथें हें सुगन्धी फूल फुलत आहे...त्यांना फुलांमुलांचे कवी म्हणतात तें यथार्थ आहे. मायलेकरांचें इतकें भावगमन व प्रतिभाशाली वर्णन मराठी साहित्यांत क्वचित्‌च आढळेल. त्यांच्या कविता मराठी काव्याचा एक मोलाचा अलङ्कार होईल...."

—साने गुरुजी, अंमळनेर

"...कवि प्रतिभावान व ओजस्वी आहे यांत शंकाच नाहीं..." —कविवर्य आनंदराव टेकाडे, नागपूर

"...डॉ. पुरवार यांची जन्मभाषा मूळची हिन्दी असून ते मराठींत कविता लिहितात हें विशेषच कौतुकास्पद आहे... माझ्या पाहण्यांतील हें असें दुसरेंच उदाहरण आहे..."

—कविभूषण खापर्डे

हिन्दु विश्वविद्यालय, काशी

---

(२) त्याग:— त्यागाची दीक्षा देऊन ध्येयाची उज्ज्वल दिशा दाखविणारें हें प्रज्वलित खण्डकाव्य एका डॉक्टरणीच्या जीवन सङ्ग्रामावर आधारलेलें आहे.

# प्रस्तावना



गेल्या फेब्रुवारींत मी हैद्राबादला जाण्यासाठीं मुंबईस आलों असतां औरंगाबादचे तरुण कवी डॉ. शंकरलाल पुरवार यांनीं माझी भेट घेऊन आपल्या ' विराट् मानव ' या काव्याचें हस्तलिखित मला दिलें आणि तें वाचून त्याला प्रस्तावना लिहिण्याची विनंति केली. कवितेच्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याची जबाबदारी मी अलीकडे सहसा पत्करीत नाहीं. पण, डॉ. पुरवार यांच्या या विनंतीला मात्र मीं तत्क्षणींच संमति दर्शविली. कारण, एक तर ते मोंगलाई अंमलाखालीं असलेल्या मराठवाड्यांतील कवि आहेत; व दुसरें असें कीं, ते जातीनें महाराष्ट्रीय नसतांनाहि मराठीच्या नितान्त अभिमानानें प्रेरित होऊन त्यांनीं हें काव्य लिहिलें आहे. त्यामुळें त्यांच्या काव्याची एक ओळहि वाचून न पाहतां मी त्याला एक प्रकारच्या कर्तव्यबुद्धीनें प्रस्तावना लिहावयाला कबूल झालों.

पण, आनंदाची गोष्ट अशी कीं, या काव्याच्या सुरुवातीलाच केलेलें शिवशंकराचें मार्मिक वर्णन जेव्हां माझ्या वाचनांत आलें, तेव्हां आपण ही जबाबदारी पत्करण्यांत कोणत्याहि प्रकारचा अविचार केलेला नाहीं, हें माझ्या प्रत्ययाला आलें. महादेवाच्या वैचित्र्यपूर्ण विभूतीवर महिम्नस्तोत्र रचणाऱ्या पुष्पदंतापासून तों आपल्या 'सप्तर्षि' काव्यांत त्याच्या 'व्योमकेशा'चें भव्यत्व सूचित करणाऱ्या सावरकरांपर्यंत आजवर अनेक प्रतिभाशाली कवींनीं उज्ज्वल रूपकें आणि प्रतीकें निर्मिलेलीं आहेत. पण, डॉ. पुरवार यांनीं या काव्याच्या प्रारंभीं शिवशंकराच्या स्वरूपाचें जें वर्णन नवीन दृष्टीनें केलें आहे, त्यांत पडलेला दिव्य आणि मानव्य यांचा मनोहर मेळ पाहून मला त्यांच्या कल्पनाशक्तीचें खरोखरच कौतुक वाटलें. किंबहुना, प्रस्तुत काव्यांतील विराट् 'मानवा'च्या कल्पनेचा त्यांनीं केलेला आविष्कार कांहीं बाबतींत इतका कल्पकतापूर्ण आहे कीं, मोंगलाईतील मागासलेल्या मराठवाड्यांतल्या एका नवकवीची प्रतिभादृष्टि इतकी विशाल असावी, याबद्दल नवल वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

या काव्यांत दोष बरेच आहेत. मीं जेव्हां प्रथम त्याचें हस्तलिखित वाचलें, तेव्हां त्यांतील पुनरुक्ति, विसंगति आणि भाषादोष हे मीं मोकळ्या मनानें डॉ. पुरवार यांच्या निदर्शनाला आणून दिले; व त्यांनींहि त्याबद्दल विषाद न मानतां शक्य त्या सुधारणा काव्य छापावयाला देण्यापूर्वी केल्या. तरी सुद्धां चोखंदळ चिकित्सकांना त्यांत रचनेचे किंवा कल्पनेचे दोष अजूनहि क्वचित् आढळतील. ते सारे दोष लक्षांत घेऊनहि मला असें म्हणावयाला शंका वाटत नाहीं कीं, मानवाचें कर्तृत्व आणि सामर्थ्य, निसर्गाच्या संहारक शक्तीविरुद्ध त्यानें दिलेली यशस्वी झुंज, 'नरेंच केला हीन किती नर' या केशवसुतांच्या उक्तीनुसार मानव्याला आपल्या पोलादी टांचेखालीं चिरडून टाकणाऱ्या सैतानी सत्तेविरुद्ध त्यानें चालविलेला प्राणान्तिक झगडा आणि त्यानें स्वतःच निर्मिलेल्या विज्ञानाच्या विनाशक चेष्टितांशीं आज त्याला द्यावा लागत असलेला सामना यांचें जें ओजस्वी आणि सरस वर्णन डॉ० पुरवार यांनीं या काव्यांत केलें आहे, तें आधुनिक मराठी काव्यवाङ्मयांत खात्रीनें अपूर्व ठरेल.

या काव्याच्या मध्यवर्ती कल्पनेंत नावीन्य आणि भव्यता आहे; व तिच्या आविष्कारांतहि ओज आणि रम्यता आहे. त्यामुळें त्यांतील इतर दोष हे मजप्रमाणेंच नावीन्याच्या प्रेमी रसिकांना क्षम्य वाटतील, अशी माझी अपेक्षा आहे. परमेश्वराच्या विश्वरूपाचें म्हणा किंवा विराट् स्वरूपाचें म्हणा वर्णन आजपर्यंत अनेक जुन्या मराठी कवींनीं केलेलें आहे. पण, मानव हा परमेश्वराशीं तुल्य किंबहुना कांहीं बाबतींत त्याच्याहून सरस असा प्रतिसृष्टीचा विधाता आहे, ही गोष्ट लक्षांत घेऊन, त्याच्या विराट् स्वरूपाचें आणि अचाट कर्तृत्वाचें शब्दचित्र रेखाटण्याचा प्रयत्न मात्र डॉ० पुरवार यांनींच या काव्यांत प्रथम केलेला मला तरी आढळला. त्या दृष्टीनें त्यांची ही पहिलीच प्रदीर्घ काव्यकृति महाराष्ट्रांतील रसिकांना स्वागतार्ह वाटेल, याबद्दल मला मुळींच शंका नाहीं.

शांतानिवास,<br>
मॉडेल मिल्स रोड,<br>
नागपूर शहर<br>
ता. १२ मे १९४३

ग. त्र्यं. माडखोलकर



# निवेदन

डॉ. शं. जा. पुरवार,
( 'कृष्ण'–मित्र )

विराट-मानव-शक्तीचा मज होता दृष्टान्त ।
भरून येतां तत्कान्तीनें हृदयींचा प्रान्त ।।
विराटतेचें गाउं लागलों अभिनव सङ्गीत ।
क्रान्ती-शान्ती अमर सुरांना मग आलापीत ।।
विराट-मानव-शक्ती-दर्शन विश्वाला व्हावें ।
मानव-कल्याणा सकलांनीं सदैव राबावें ।।
सर्वांभूतीं वास करितसे एक जसा जीव ।
अवघ्या हृदयीं तशि नान्दावी प्रीती राजीव ।।
मानवतेचें मङ्गल व्हावें धरून मनीं हेत ।
व्यक्तीवर नच दोषावरती केले आघात ।।
साध्य व्हावया हेतु मनींचा सर्व खटाटोप ।
विराट शक्तीवरी चढविला काव्य-जरीटोप ।।

२२–१–१९४३

# विराट मानव



१



विश्व विधाता मी सुखकर्ता चालक सर्वांचा ।
आदि अन्त नच जया असा मी पालक विश्वाचा ॥
जगास त्राता, चिरसुख धाता, मी कर्ताहर्ता ।
अज्ञेयाचा विराट अंशच मी सरता पुरता ॥
निपट निरञ्जन मीच चिरन्तन, सर्वांचा सार ।
जळीं-स्थळीं अन् नभीं निरन्तर माझा सञ्चार ॥
बाळ [1]नरांचा बाप जोंवरी, चन्द्र-सूर्य-तारे ।
अमर तोंवरी, स्थिति-लय बघतों युगानयुग सारे ॥
विश्वाआधीं जन्म असे मम, मृत्यु तयामागें ।
उकलीतांना कधि न भागतों सृष्टीचे धागे ॥
उलथापालथ प्रचण्ड व्हाया खण्ड न यत्नांत ।
विश्वापोटीं घुसुन प्रत्यहीं त्यास पोखरीत ॥

---

१. **बाळ नरांचा बाप जोंवरीः—मूल हा पुढील पिढीचा ज आहे तोंवर.**

सृष्टीसम नच आवडतें मज अन्य दुजें कांहीं ।
तिच्या पदावर सदासर्वदा मस्तक नत राही ॥
मी सृष्टीच्या शृंगाराचा अभिनव उल्हास ।
विराट ताण्डव नृत्योत्पादक, मूर्तिमन्त नाश ॥
मी शिवशङ्कर,[१] महा भयङ्कर, रक्तधुपाङ्गार ।
मी योगेश्वर प्रळय धुरन्धर, भोळा साकार ॥
हलाहलासम कराल विषही मीच पचविगारा ।
गुप्त अशा मम तृतीय नेत्रें आग ओकणारा ॥ २० ॥
क्रोधें मदना जाळियलें परि मोहा फसणारा ।
विवेक सोडुन मीच मोहिनीमागें पळणारा ॥
स्वयं दिगम्बर, उज्ज्वल मङ्गल हवी मला सृष्टी ।
अधिक याहुनी हवी कोणती त्यागाची दृष्टी ॥
खङ्क-रङ्क-नृप सर्वांभूतीं प्रेमाची वृष्टी ।
विश्वामध्यें मला न बघवे कुणासही कष्टी ॥

---

१. **शिवशङ्करः**—ब्रह्मा, विष्णू, महेशादि सर्व देव प्रथम मानव योनींतच जन्मले असावेत; पण पुढें त्यांनीं आपल्या अचाट सामर्थ्यानें जगास दिपविलें म्हणून त्यांची देवकोटींत गणना झाली. ही भावना गृहीत धरून कवीनें शिवशङ्करास मानवकोटींतीलच मानिलें आहे. त्याच्याजवळील तो गलेलठ्ठ नन्दी, त्याच्यावरील त्याचें निस्सीम प्रेम, त्याच्या हातांतील तो शेतकी आयुधासारखा दिसणारा त्रिशूळ, त्याचें तें रानोमाळ भटकणें, भिल्लिणीच्या मागें धांवणें, त्याचें तें भस्मांकित—नव्हे धूलांकित शरीर, त्याचा तो रानटी नाच, त्याचे ते रानटी सहचरी, त्याच्या मनांतील भूतदया वगैरे पाहून त्यास कवीनें एक क्रांतिकारक शेतकरी मानिलें आहे. नाहीं तरी त्याचा तो नन्दी, गळ्यांतील सर्परूपी चाबूक व त्रिशूळरूपी नांगर कुणालाहि कवीचेंच म्हणणें पटवील.

वसुधेच्या सुख-शान्तीसाठीं श्रमतों दिनरात ।
अशुद्ध तें नाशाया जळते नाचवितों पोत ॥
धूलि-कणांतुन धन-धान्याची उभवितसे रास ।
मृत्तिकेंतुनी सहज निर्मितों थोर वैभवास ॥ ३० ॥
नन्दी डौलें नाङ्गरीत मम पुरातना चाले ।
त्रिशूळ खणखण नव्या मनूचे बोल खडे बोले ॥
विनाश डमरू निनादतां नभ, शैलराज हाले ।
चरणरजानें पावन माझ्या धूलीकण झाले ॥
रुण्डमाळ घालून नाचतों नाच पिशाचांत ।
देवेन्द्रादिक होउन विस्मित मान तुकवितात ॥
मांस भक्षिती भृङ्गी-शृङ्गी माझे अनुचर ते ।
परी सदाचें माझें त्यांशीं प्रेमाचें नातें ।
रावण, बाणासुरहि जिवाला माझ्या आवडती ।
अखण्ड तैशी प्रीती माझी देवांच्यावरती ॥ ४० ॥
कुठें भिन्नता दिसे न मजला रङ्गारङ्गांत ।
भस्म चर्चुनी म्हणुन राहतों मी रङ्गातीत ।
कैलासीं जरि, आवडती मज बाळहि सकलांचे ।
बाळ-दर्शनें घडतें दर्शन मज चैतन्याचें ॥
नन्द-घराला[१] यास्तव गेलों भस्मा चर्चून ।
बाळ-दर्शनीं मोद किती तो कळे न चर्चून ॥

---

१. कृष्ण जन्मल्यानंतर शिवशङ्कर त्यास पाहण्यास गेले होते.

कोटि फुलांची कोमलता जरि वसते शिशु-देहीं ।
मुठींत चिमण्या दिसते क्रान्ती मज ज्वालाग्राही ॥
बाळ-लोचनीं भूतकाल मज दिसतो रडतांना ।
चालूं नाचत, दिसतो मजला भविष्य हंसतांना ॥ ५० ॥

अनन्त भवतीं पावित्र्याचे नद पाझरतांना—!
दिसती, रक्ताधरिं साम्राज्यें मज थरथरतांना ॥
मांगल्याचे अनन्त दिसती स्रोत लोचनांत ।
लकलकणारें तेज चिरन्तन दिसतें हास्यांत ॥
इवल्या चिमण्या वदनीं दिसतो विश्वाचा गोल ।
सृष्टिहि दिसते निज कर्माचें घेतांना मोल ॥ ५६ ॥



विराट पुरुषा गीतेमाजीं असें वर्णियेलें ।
श्रेष्ठ त्याहुनी, विराट शक्ती कोणी मज बोले ॥
आकाशाहुनि उञ्च असें मम मस्तक अति थोर ।
त्यांत तारका ग्रह-गोल किती नाचतात स्वैर ॥

हंसतों, त्यांच्या सवें सदोदित प्रेमानें रमतों ।
सन्निध बसवुन त्यांच्यासह मी गुजगोष्टी करितों ।
कधीं दावितों मार्ग तयांना, रोखुनिया धरितों ।
रागवून कधि त्यांच्यावरती स्वाऱ्यांही करितों ॥

नातेंगोतें जुळवून त्यांचें कधीं कधीं देतों ।
एक दुज्यावर हक्क तयांचे प्रस्थापित करितों ॥
मीच भूपती या सर्वांचा, माण्डलीक असती ।
क्षणाक्षणाला चुकवुन माझ्या करभारा देती ॥

माझ्या हुकुमावरी चालतो सारा व्यवहार ।
छिन्नभिन्न नक्षत्रें करण्या समर्थ साचार ॥ ७० ॥

येथें घडती नेत्रकटाक्षें मम उल्कापात ।
घोङ्घावत ये पिसाट वारे हालवितां हात ॥

नाचतात मम शब्दावरती पञ्च महाभूत ।
पुरवुन घेतों त्यांच्या करवीं माझे मी हेत ॥

एके काळीं ग्रह-गोलांना नाचविलें डोईं ।
देव-घरांतुन देवासन्निध बैसविलें त्यांहीं ॥

गतिवर त्यांच्या भाग्योदय मम नित्यच ठरवून ।
सान कर्महि न केलें त्यांच्या आज्ञेवांचून ॥

हालचाल मम यापरि जातां त्यांच्या हुकुमांत ।
आत्म-शक्तिचा लोप जाहला, तेजाचा अन्त ॥ ८० ॥

कळून येतां परि दगडांना दिधला थोरपणा ।
लोटुन दिधलें दाहि दिशांना क्रोधानें त्यांना ॥

खिळखिळलेल्या आणि शोधुनी त्यांच्या हाडांना ।
पूर्ण तयांची जगा दाविली दशा हीनदीना ॥

आकाश-पटीं बुद्धिबळाच्या रमतों खेळांत ।
ग्रह-प्याद्यांना सारुन करितों कालावर मात ॥

चाल उलटते डाव लागतो कधि प्यादेमात ।
निराश होउन खिन्न न बसतों परन्तु तिमिरांत ॥

नित प्राणांचें मोल लावुनी, ग्रहगोलावरती ।
छापे घालुन घरदारांची घेतों मी झडती ॥ ९० ॥

निर्जन रानें, घनदाट वनें कुठें वाळवण्ट ।
त्यांचा खळगे कुठें शोधिले कराल सुरवण्ट ॥

दऱ्या, कपारीं सुळके कोठें अग्नीचा पाश ।
आणि शोधिली कुठें गिरीसम बर्फाची रास ॥

भूमि दाविली जगता कोठें कणखर खडकाळ ।
जिथें न वसणें अल्प कालहि काळांचा काळ ॥

चमचमणाऱ्या रौप्य-महाला जाळी मोत्यांची ।
पाहत होते तींतुन गम्मत अवघ्या सृष्टीची ॥

करीत होते जर्जर ग्रह हे अखिल मानवास ।
पराक्रमें तद्वैभव दिधलें मिळवुन मातीस ॥ १०० ॥

रज्जुंत गुम्फुन अतां फिरवितों तयां अन्तराळीं ।
क्रोधाची मम आग मनींची शान्त न परि झाली ॥

कुणास वदतों आतां तुम्ही गळून पडणार ।
कुणास देतों शाप तिथीला अमक्या मरणार ॥

आणि शेवटीं वदलों तुमचा पुरे अतां ताबा ।
तुम्हीच आमुच्या हातीं आतां पुरेपूर राबा ॥

नवलाखाची नवलपरीची दौलत ही सारी ।
मानव-हस्तें उघडी पडतां आली बाजारीं ॥

नेत्रावरच्या पटा सारितां बघवे नेत्रानें ।
एक पिशाचा असें सारिलें दूर मानवानें ॥ ११० ॥
असे कितीतरि समन्ध बसले या मानेवरती ।
फेंकुन त्यांना तुडविन पायीं यांत न शङ्का ती ॥
सिंह झोंपता तदङ्गावरी मूषक रमतात ।
गत ती, आतां परी जागलों विराट झोंपेंत ॥
विरूं लागलें तम-जाळें अन् झोंपेची धुन्दी ।
पिञ्जऱ्यांतुनी सुटूं लागले नवजवान बन्दी ॥

* * *

तेतिस[1] कोटी गगनांतिल नव-रङ्गी पुतळ्यांना ।
हांसवितों, मी खेळवितों अन् रडवितोंहि त्यांना ॥
मम शब्दावर जन्मतात हे शब्दावर मरती ।
झोंपवितों त्यां बोलवितों मम सत्ता त्यावरती ॥ १२० ॥
या पुतळ्यांचें अभेदपण मज मुळीं न साहून ।
अनन्त त्यांच्या त्यांच्यांत दिले भेदहि निर्मून ॥
पुढें बनविलें देव कुणाला दानव अति क्रूर ।
कलह पेरुनी त्यांच्यांतहि रण माजविलें घोर ॥
कैलासावर कुणा बसविलें इन्द्रपदावरती ।
क्षीरसागरीं कुणास दिधली पन्नगशय्या ती ॥
कुणास दिधलीं अनेक वदनें कुणा तीनचार ।
अनेक कर लावून बनविलें रूप महाघोर ॥

---

१. तेतिस कोटी गगनांतिल पुतळे—स्वर्गांतील देव.

गजवदनाचा गणेश केला पूजेच्या काजा ।
डोकें मोठें दिसतां केला सरस्वती-राजा ॥ १३० ॥

मनांत आलें रूप तसेंची दिधलें लडिवाळ ।
रूपहीन अन् कुणा दिगम्बर केलें बेडौल ॥

भव्य बान्धुनी प्रासादांना, दिला इन्द्रलोक ।
शोभविला लावून हिरे अन् मोत्यांचे झोक ॥

शृङ्गाराचा साज चढवुनी रङ्गमहालांना ।
तिथें निर्मिल्या विश्व-मोहिनी दिव्य अप्सरांना ॥

सुधा-सुरा-विख वाहविला मग नाचरङ्ग पूर ।
देव न, घडली मद्हृदयांतिल मूर्त पुरेपूर ॥

विलास, वैभव, सौख्य जयांचा वर्णवे न नूर ।
तिथें निर्मुनी वाहविला मीं नरक महामूर ॥ १४० ॥

भक्तीभावें वेडा बनुनी तत्पूजा केली ।
निराकार जें त्यास आणिलें आकारें खालीं ॥

तीन्हिकाल मग गात राहिलों तद्गुण-गानाला ।
नमाज चुकलों पांच वेळ नच कधीं पढायाला ॥

चर्च मशीदी भव्य देउळें निर्मुन सुन्दरशीं ।
आत्म-सुखांच्या त्यांच्यापायीं वाहविल्या राशी ॥

मानवधर्मा मानवकर्मा विस्मरलों शर्मा ।
त्यांच्यासाठीं सर्वस्वाच्या पेटविलें होमा ॥

होमांतुन या परी जाहला द्वेषांचा स्फोट ।
मानवतेचे माङ्गल्याचे हादरले कोट ॥ १५० ॥
नित्य करविलें दूध, दहीं अन् पञ्चामृतपान ।
रक्त-तृष्णा अघोरशी परि त्यांची शमली न ॥
पक्वान्नें, नैवेद्य, शेरणी तूपसाखरेची ।
भूक परी नच शान्त जाहली मानव मांसाची ॥
या देवांनीं निजभक्तांना केलें लाचार ।
अनिर्वाच्यसे आणि भूवरीं माण्डियले चार ॥
माजवून मतभेद भयङ्कर धर्माधर्मांचे ।
यांनीं भैरवनृत्य करविलें नित रणचण्डीचें ॥
जीव कितीतरि कामीं आले धगधगलें कुण्ड ।
मनुजास्थींच्या आणि भडकल्या ज्वाला अतिचण्ड ॥ १६० ॥
निज उत्कर्षा माङ्गल्यास्तव दिला जन्म ज्यास ।
प्राणान्तिक मानेला त्यांनीं आवळिला फास ॥

*　*　*　*

[१]सङ्कट येतां देवां वदलों त्यातें नाशाया ।
ऐकितां न, मीं कमी न केलें शासनास द्याया ।
नैवेद्याविण दीर्घकाल त्या जळांत बुडवून ।
अन्धाऱ्या खोलींत ठेविलें त्यांना कोण्डून ॥
कर्तव्या परि देव विसरले क्रूर दैत्य बनले ।
दगड बनोनी नरयज्ञाचें कुण्ड पेटवीलें ॥

---

१. सङ्कट आलें असतां ईश्वरानें तें निवारावें म्हणून देवांना पाण्यांत किंवा अंधाऱ्या खोलींत डाम्बून ठेवण्याचा कुठें कुठें प्रघात आहे.

थोरांच्या अन् बाळ जिवांच्या रुधिराचे पूर ।
या देवास्तव या धर्मास्तव वाहविले थोर ।।

परी न धुन्दी डोळ्यांवरली धर्माची सरली ।
मानव-हृदयें मन्नयनाला महाक्रूर गमलीं ।।

अदृश्यास्तव दृश्याचा नित भैरवसंहार ।
ठाव न ज्याचा त्यास्तव मानवरक्ताचा पूर ।।

वाहुं लागला, हादरला हा पृथ्वीचा गोल ।
भक्ती-वीणा भङ्गुन श्रवणीं आले हे बोल ।।

" देव न, लेवुन धर्म-दुशाले बसले हे काळ ।
भडकविती धर्माधर्मांचा आग्या वेताळ ।। "

* * *

दानव-मानव-सङ्कर-लाघव यापासुन दूर ।
भेदाभेद न मला मानवे धर्मांचा धूर ।।

याच धुरानें दृष्टी झाली अन्ध अतीक्रूर ।
द्वेषानल भडकून बदलला सृष्टीचा नूर ।।

बुडूं लागतां सौजन्याची धर्म-तर्मीं नाव ।
मानवहृदयीं जागविला झणीं समतेचा भाव ।।

धर्मान्धारें पूर्ण व्यापितां मनुज-जीवनाला ।
तिमिरा हरिलें दिव्य देउनी ज्ञान-प्रकाशाला ।।

ज्ञान-प्रकाशें अन्धश्रद्धा पार लया गेली ।
महान ईश्वर मीच, भावना जागृत ही झाली ।

ओळख पटतां निज आत्म्याची सृष्टीचा नूर ।
बदलुन गेला वाहुं लागतां बुद्धीचा पूर ।। १९० ।।

श्रद्धा-सिन्दुर उडतां उरला दगडांचा ढेर ।
तेजापुढतीं किती चालणें तिमिराचे चार ।।

हां हां म्हणतां अवजड ऐशा दुज्या समन्धास ।
दूर लोटिलें आणि घेतला सुटकेचा श्वास ।।

स्वर्ग-भूमिचें अस्तित्वच मम शब्दावर एका ।
हालवितां शिर बसतो त्यांना सर्वनाश धक्का ।। १९६ ।।

---

# ३



निसर्गास भूवरीं बोलती बापच विश्वाचा ।
ऐकुन तें तिळपापड होतो माझ्या अङ्गाचा ॥

देव वदुनिया त्यास वन्दिती कुणी कुणी लोकीं ।
लीला त्याची क्रूर परन्तू कुणी न अवलोकी ॥ २०० ॥

अफाट निर्मुन सृष्टि, सोडुनी दिलें बालकांस ।
जेव्हां नव्हती अल्पहि जागा कुठें आश्रयास ॥

जेथें तेथें भयाण होतें रान माजलेलें ।
तीक्ष्ण विषारी होते कांटेकुटे पसरलेले ॥

भेसुर होतें सारें, नव्हती अल्प कुठें माया ।
पाला-पाचोळ्याविण नव्हतें अन्न दुजें खाया ।

उन्हापासुनी होती तरुची छाया रक्षाया ।
पर्जन्यापासून भव्यशा दगडाची छाया ॥

उशास होते कणखर गोटे धूळ अन्थराया ।
वृक्ष-लता, अन् अनन्त होतें व्योम पाङ्घराया ॥ २१० ॥

थण्डीपासुन नव्हतें कांहीं शरीर झांकाया ।
फकाक होतें सारें, होती नग्न मनुजकाया ॥

मयद स्वराविण येत न होतें कांहीं ऐकाया ।
येतहि नव्हता भाव मनींचा बोलुन दावाया ॥

यास्तव गमली सृष्टि मला ही महा उग्र लांव ।
निळया जळाची गिरिमालांची फैलावित माव ॥

काळें बनजर तिचा भासला केसांचा पुञ्जा ।
ज्यांत खुपसिला तिनें राठसा फान्याचा पञ्जा ॥

खाजवितां ती केसां होई करकरसा नाद ।
खळखळ गळती पिकलीं पानें जीवाणूं वृन्द ॥ २२० ॥

जाळींत किती राहत होते हिंस्र पशू घोर ।
रविकिरणा नच मार्ग सांपडे शिरावया पार ॥

कपाळ दिसलें भरलेलें तें पूर्ण टेङ्गळांनीं ।
सपाट भूमिहि दिसली नच जी भरली आठ्यांनीं ॥

लाम्बरुन्द भिवयांच्या राकट झुडपांच्या राङ्गा ।
गालावर हाडांची दिसली भव्य अशी पागा ।

दोहोंमध्यें डोळे गमले खोल दऱ्याखोरीं ।
पेकाट उभट नाकाडाचा ज्यांचा छेद करी ॥

ताम्बुस नेत्र न दर्‍यांत दिसले आगीचे लोळ ।
ताण्डव-नर्तन माजविती कधि भूवर विक्राळ ।। २३० ।।

नाकाचा त्या सुळका दिसला तीव्र अणीदार ।
रन्ध्र न, वारुळ सर्प सोडिती ज्यांतुन फूत्कार ।।

राड धरा मन्मना भासली दीर्घ कर्ण-भाग ।
छिद्र न, भूमांतून धांवते मुङ्ग्यांची राङ्ग ।।

उग्र मुखाचें खोरें गमलें रुद्र सर्वभक्षी ।
अधर-नगाची राङ्ग जयातें सर्व काळ रक्षी ।।

बळकट मान न गमलें भूशिर जुळवित भूभागा ।
वक्षावरल्या खडकाळ अशा अनन्त गिरिराङ्गा ।।

वक्षाखालीं भैरव दिसली पोटाची खाई ।
जियेंत वसलें खारें पाणी वडवानल दाही ।। २४० ।।

सर्वाङ्गावर दाट पसरली कांटेरी राई ।
मार्गहि नव्हता चालाया जो धैर्य मना देई ।

अडवेंतिडवें रूप, भासली मज कैदाशीण ।
नजर फेंकतां भंवतीं झालों मनीं उदासीन ।।

पशूंत आणिक मानवांत मज दिसला नच भेद ।
जन्म कशाला असें ? न कळतां, झाला मनिं खेद ।।

काय करावें कळे न असल्या गोन्धळल्या काळीं ।
कुचम्बणा अतिघोर निसर्गें मनुजांची केली ।।

कधीं न दिधलें शिक्षण बाळां आपुल्या हातानें ।
शिकूं लागतां त्याच्या हरिलें प्राणाचें लेणें ॥ २५० ॥

कांटे टोचुनि रक्त काढिलें अन्न बाळकांचें ।
सान चुकीसहि सदा घेतले बळी अनेकांचे ॥

प्राणांच्या मोबदल्यांत दिलें अल्प शिक्षणाला ।
अनन्त ठेंचा देउन दिधलें अल्पच ज्ञानाला ॥

बाळां न जगीं फुलां शिकविलें कैसें हांसावें ?
अक्षर बनुनी विश्वशिरावर कैसें नाचावें ॥

शून्यामधुनी कैशी ये नव सृष्टी जन्माला ॥
मृत्तिकेंतुनी सोनें पिकतें बोध न हा केला ॥

कुठें करावें आरम्भा अन् कोठें थाम्बावें ।
मार्ग कोणता श्रेयस्कर जगिं, कुणास वन्दावें ॥ २६० ॥

बोध न केला कसला जवळीं बसवुन प्रेमानें ।
" बाप न राक्षस सत्य जगीं जो पितृ-कर्म नेणे " ॥

* * *

अफाट विश्वीं जन्मा देउन बाळा पोसावें ।
निजरक्ताचें दूध पाजुनी त्यास वाढवावें ॥

समाधान निजसुखा विसरुनी त्यास जोजवावें ।
प्रचण्ड तापा साहुन त्यातें गोड गीत गावें ॥

मायेची त्यावरी घालुनी नाजुकशी झूल ।
जोपासाया हवें शोषुनी विश्वाची धूल ॥

सौभाग्याचा चढवुन त्यावर विद्येचा साज ।
नटवायाला हवें तया हें वडिलांचें काज ॥ २७० ॥

शस्त्रास्त्रां शिकवुनी, बनवुनी योग्य नागरीक ।
सोडाया त्यां हवें राहुनी नित्य जागरूक ॥

विषम जगीं या घोर मातला जीवनसङ्ग्राम ।
आग पेटली चोहींकडुनी कुठें न आराम ॥

बनवाया त्या हवें धुरन्धर यास्तव नावाडी ।
भवसागरिं या अफाट देउन सत्यांची होडी ॥

अज्ञेयांतुन अज्ञेयाला असें जावयाचें ।
बाळ जिवा पथ दाखविल्याविण कसें कळायाचें ॥

* * *

कोमलतेची जडजीवांची मधु-माङ्गल्याची ।
निसर्ग राज्यामधें उडाली दैना सकलांची ॥ २८० ॥

हंसतां हंसतां दिसली कलिका गळून पडतांना ।
माधुर्यातें देण्यापूर्वी सुफळें कुजतांना ॥

पूर्वेला जरि काञ्चन-गिरी ते दिसति नाचतांना ।
आशेसम झणिं विरून जाती बघतां बघतांना ॥

विश्वसुखास्तव कोम्ब उपजता दिसला जळतांना ।
निसर्ग दौलत अशी पाहिली धुळींत मिळतांना ॥

विपरित लीला बघुन अन्तरीं करित विचाराला ।
रानीं कण्ठित असतां खडतर अशा जीवनाला ॥

देव मानुनी वन्दित असतां वृक्षा दगडाला ।
बघून असतां भीत जराशा कीडकीटकाला ॥ २९० ॥

स्वाद पहाया चाखित असतां विषमय वस्तूला ।
हुङ्गित असतां प्रेमभरानें जहरी सुमनाला ॥

अमोल वर्षें आयुष्याचीं अशक्य शोधांत— ।
वेंचित असतां थोपविलें नच रोखुनिया हात ॥

निसर्ग होता उलटा हांसत बघून दैन्याला ।
परी तयानें उत्कर्षाचा मार्ग न दाखविला ॥

आणि मुखावर प्रेमळ त्यानें फिरविला न हात ।
प्रेमें बालक निजतां अङ्कीं केला तद्घात ॥

मउ मखमाली हरित तृणावर मुदें लोळतांच ।
नागिणीस सोडून करविला मृत्यूचा नाच ॥ ३०० ॥

पिठुल चान्दणें बघुन सोडितां सरोवरीं नाव ।
उलटुन दिधली मध्यजलीं ती साधुनिया डाव ।

जबाबदारी असतां त्यावर शिशु-आरोग्याची ।
अल्प तयानें परि न वाहिली चिन्ता कोणाची ॥

उलट निर्मुनी भयाण व्याधीं विषमय वस्तूंला ।
कीड लाविली आयुष्यातें, बलाढ्य शरिराला ॥

प्लेगासमान रोग भयानक तयें जागवून ।
भरल्या सदना ओस पाडिलें केलें वैराण ॥

रोग न, सुटलें मोकाटच जणुं वादळ अति घोर।
कळ्यां-फुलांसह उलथुन पडले वृक्ष महा थोर॥ ३१०॥

बघतां बघतां गोळा आला हळूंच जाङ्घेंत।
क्षणांत सण सण ताप वाढला झाला तों अन्त॥

औषध द्याया जरा लाभली कोणा नच वेळ।
ढीग पाहुनी प्रेतांचा मनिं थरारला काळ॥

एक लागला घरांत, दुसरा, तिसरा त्यामागें
क्षणीं लागले सारे, त्यांना काळ-झोंप लागे

कुठें राहिला माणुस एक न घरीं रडायातें।
चाळिंत नुरले कोणी त्यांना शान्त करायातें॥

शुश्रूषेला देखिल कोणी उरला नच सदनीं।
मरतां मरतां कितिकां प्याया लाभलें न पाणी॥ ३२०॥

फुललीं होतीं उद्यानांसम गृहें मानवांनीं।
लावायाते तिथें न उरला साञ्जवात कोणी॥

वंश जाहले नामशेष किति त्यांची नच गणती।
लखलख होता प्रकाश तेथें दिसली नच पणती॥

घरें जाहलीं ओस, आणखी स्मशान गांवांचें।
प्रेतकळा येऊन बदललें स्वरूप शहरांचें॥

कुणा बघावें किती रडावें कळे न कवणाला।
प्लेग दयाळू!! त्यानें त्यासहि त्वरें मुक्त केला॥

खण्डींतुन अन् कुठें वांचली एकच म्हातारी ।
तरूण विधवा कोठें दिसली स्फुन्दत अन्धारीं ।। ३३० ।।

पर्वतप्राय प्रेतावरती बालक अज्ञानी ।
रान्नत दिसलें पुकारतांना ' आई गं ', म्हणुनी ।।

जिवन्त-मेली भेद न कळतां सान अर्भकांना ।
मृत-मातेच्या पयोधरातें दिसालें चोखतांना ।।

परी न शमतां तत्पोटाची धगधगली आग ।
तेंहि निघालें काढायातें आईचा थाङ्ग ।।

घरोघरीं उच्चावत होतें शोकाचें पाणी ।
पथ-पाटानें वाहत होतें चाळी-चाळींनीं ।।

शहराच्या फोडून तटाला गांठुन गांवाला ।
जागजागिच्या धुऊन नेलें शान्ती-सौख्याला ।। ३४० ।।

प्रेतालागीं दुर्लभ होता मनुष्य उचलाया ।
लांकुड होतें दुर्मिळ तैसें अग्नीतें द्याया ।।

ठेवायातें प्रेता जागा स्मशानांत नुरली ।
अन्त्य-विधीच्या सामानाची टञ्चाई गमली ।।

' हां ! हां ! ' वांचुन येत न होता ध्वनि दुसरा कानीं ।
कोल्हे-कुत्रीं भुङ्कत होतीं भर रस्त्यांमधुनी ।।

पिसाट वारा साङ्गत होता गर्जुन जगताला ।
निसर्ग-करणी क्रूर भयङ्कर लाजवि दैत्याला ।।

अक्षय ऐशा काळ-वहीवर मानव टिपणाला ।
करीत होता, शासन द्याया घोर निसर्गाला ॥ ३५० ॥

उपाय आधीव्याधीवरचे सुचविले न त्यानें ।
कत्तल केली एकसारखी क्रूर कसायानें ॥

ज्योति अकालीं किती विझविल्या त्यांस नसे अन्त ।
पिता अशाला कुणी बोलतां वाटे मज खन्त ॥

सांथीच्या खड्गास उपसुनी दाखविला हात ।
शोधुन त्यावर औषधास नित केली मीं मात ॥

निसर्गास मीं इथें दापिलें सांगुन तत्कालीं ।
" दूर रहा नित उत्कर्षाच्या मन्मार्गांमधुनी " ॥

* * *

निसर्गास कुणि यास्तव वदतां विश्वाचा तात ।
सन्तापानें भडका माझ्या हृदयाचा होत ॥ ३६० ॥

देवांना मीं दगड बनविलें, ग्रहां दऱ्यांखोरीं ।
सहन कशी मग व्हावी मजला निसर्ग मातबरी ॥

चणचण अवघी प्रशान्त होतां जरा भोंवतीची ।
करूं लागलों यत्न मोडण्या खोड निसर्गाची ॥

क्रोध अतीशय हीन दशेचा मनास येऊन ।
सङ्क्रमणास्तव उभा ठाकलों दण्ड थोपटून ॥

कृपण धनाला जसा ठेवितो भुईंत गाडून ।
निज सम्पत्ती तशी ठेविली त्यानें दडवून ॥

मिळो न ती कधिं कवणा त्याचा हेतु असा दिसला ।
परी ‘ बापसे सवाइ बेटा ’, मानव हा ठरला ॥३७०॥

पणास लावुन वेळ प्रसङ्गीं अपुल्या प्राणाला ।
अतुल प्रयासें, चातुर्यानें शोधियलें तिजला ॥

कोठाराचा असा लागतां जरा मागमूस ।
उघडी केली पूर्णपणें मीं प्रकृतिची कूस ॥

एक एक मग उघडुं लागलों निसर्ग-भाण्डारें ।
मनीं विरमला तोही पाहुन बुद्धीचे वारे ॥

प्रकृति-करांतुन राज्य घेतलें मग हिसकावून ।
साम्राज्याची धवल पताका दिली उभारून ॥

निसर्गावरी ओझें जरि या शापातापाचें ।
मत्कर-किरणें भाग्य जागलें तीनहिं लोकांचें ॥ ३८० ॥

अविश्रान्त उभविण्या लागलों सोख्याची बाग ।
धुवावयातें सृष्टीवरले रक्ताचे डाग ॥

कैकाडिणिसम असतां विद्रुप पृथ्वी खडकाळ ।
पालटिलें मीं रूप तिचें परि यत्नें विक्राळ ॥

बनजर तोडुन हिंस्र पशूंना प्रेमें पाळून ।
समान केलें भूला खांचा-खळगे बुजवून ॥

रुन्द काढिले मार्ग तयांतून गाळुन घामाला ।
छाया केली वृक्षां लावुन दोन्ही बाजूंला ॥

झाडावरती सोडुन दिधल्या नाजुकशा वेली ।
कुठें निर्मिलें लता-कुञ्जही करावया केली ॥ ३९० ॥
[1]**हलती झुलती** नानापरिचीं सुन्दर **उद्यानें** ।
एका वृक्षावरी लाविलीं नवविध तीं सुमनें ॥
गगन-स्पर्शी नयन-मनोहर भव्य राजवाडे ।
उभवुन दिधलें गातो ज्यांचे कालहि पोवाडे ॥
**पिउळें देउळ,**[2] **मशीद हिरवी,**[3] **कमान वीटांची** ।[4]
**गोल-घुमट**[5] अन् अक्षय नकशी बुद्ध-देउळांची ॥
**ग्वाल्हेराचा दुर्ग,**[6] कुशलता रोमन लोकांची ॥
स्तम्भित करिते विश्वास कला **कलत्या स्तम्भाची**[7] ॥

---

१. **हलती झुलती उद्यानें**:–हीं बेबीलोनमध्यें आहेत.

२. **पिउळें देऊळ**:–हें पेकिंग (चीन) मध्यें आहे. सातव्या शतकांत याची दुरुस्ती करण्यांत आली.

३. **हिरवी मशीद**:–ही टर्कींत असून तिचें बांधकाम १४२३ मध्यें पूर्ण झालें.

४. **कमान वीटांची**:–जगांतील सर्वांत जुनी व चुन्याशिवाय बान्धलेली ही विटांची भव्य कमान इराकमध्यें असून ती इ. स. ५५० मध्यें बान्धून पूर्ण झाली असावी.

५. **गोल घुमट**:–हा जगांतील सर्वांत मोठा घुमट विजापूरला असून त्याचा व्यास १२४ फूट आहे.

६. **कुशलता रोमन लोकांची**:–इटलींत इ. स. ८० मध्यें बान्धलेली कोलोसियम नांवाची जगप्रसिद्ध इमारत अजून आहे. तींत एकाच वेळीं ५०००० पेक्षां जास्त प्रेक्षक बसतील अशी व्यवस्था आहे.

७. **कलता स्तम्भ**:–हाही इटलींत असून तो बाराव्या शतकांत बांधला गेला. त्याची उंची १७९ फूट आहे.

**ताजमहालें** हद्दच केली जगीं कौशल्याची ।
**वेरुळ लेणीं** साक्ष पटविती अफाट बुद्धीची ॥ ४०० ॥

रेषेंतुनहि जीव नाचवी **कला अजिण्ठ्याची** ।
**पिरामीडही**[1] ग्वाही देती मच्चातुर्याची ॥

कालाहुनही जुनीं भासती उद्यांहुनही नवीं ।
कला विशाला अशी निर्मितों विश्वा जी सुखवी ॥

**गोमाता**[2] **बुद्धांचे पुतळे** अपार वर्षांचे ।
काल-जनक मी, कोण करिल मग मोजमाप त्यांचें ॥

दीर्घकाल कुणि इथें न जगणें काळाचा नेम ।
प्रदीर्घ कालापासुन परि हे आहेतच क्षेम ॥

अधान्तरीं नच कांहिं राहणें नियम निसर्गाचा ।
विमान गगनीं उडवुन केला भङ्ग कायद्याचा ॥ ४१० ॥

पानभुईवर कधीं न तरणें वस्तु वजनदार ।
चण्ड जहाजें बनवुन केला तीवर सञ्चार ॥

१. **पिरामिडः**–इजिप्तमध्यें असून सर्वांत मोठें पिरामिड ५००० वर्षांपूर्वी बांधलेलें आहे. त्याची प्रत्येक बाजू ७४६ फूट लांब व उंची ४५० फूट आहे.

२. **गोमाताः**–गोमाता राया नांवाचा उभा पुतळा म्हैसूरमध्यें असून तो २००० वर्षांपेक्षांही जुना आहे. उंची ७० फूट आहे.

**बुद्धांचे पुतळेः**–जपानमध्यें एक ब्राँझचा बनविलेला पुतळा आहे. त्याची उंची ५० फूट असून वजन ४५० टन आहे.

सयाम, मलाया आणि अनेक देशांत बुद्धांचे मोठमोठे पुतळे सांपडले आहेत व सांपडत आहेत.

जलधीं पोटीं शक्य न करणें कोणा व्यवहार ।
पोटीं शिरुनी दिव्य काढिले मोत्यांचे हार ॥
भूगर्भांतुन मार्ग काढिले नगां पोखरून ।
अडवें येतां कोणी त्याचे तुकडे उडवून ॥
धूलीकण उचलून करानें गगनीं शोभविलें ।
पाल्यापाचोळ्यांतुनही मीं वैभव निर्मियलें ॥
भव्य सागरा परिश्रमानें आवर घालून ।
भूगोलाचें अन्तर आलों सारें कापून ॥ ४२० ॥

कोळशांतुनी शुभ्र शर्करा काढुन दाखविली ।
नश्वरतेंतुन सदा अमरता पहा जागवीली ॥
पाण्याच्या ओघानें त्यानें दुभङ्गिली भूमी ।
उत्तुङ्ग असे पूल बान्धुनी सान्धियली परि मीं ॥
वाहविले त्यावरुन प्रीतिचे पाट देशदेशीं ।
मानवतेला सान्धायातें मायेच्या पाशीं ॥
**आर्च ब्रीज[१] अन् उई रेलवे ब्रीज अवाढव्य ।**
पटवाया जणुं जन्मा आले मम शक्ती भव्य ॥
पाण्यापासुन आग निर्मिली वीज महाघोर ।
विजेंतुनी नव ऐश्वर्याचा वाहविला पूर ॥ ४३० ॥

---

१. **आर्च ब्रीजः**—हा पूल अमेरिकेंत असून बांधकामांतील एक महान चमत्कार म्हणूनही त्याचा लौकिक आहे.

**उई रेलवे ब्रीजः**—हा पूल जपानमध्यें असून टोकियोहून ओकासाला जातांना लागतो. तो ३३३२ फूट लांब आहे.

दृष्टीपासुन जरी लपविले सूक्ष्म जीव त्यानें ।
जरी निर्मिल्या वस्तु अशा ज्या दिसति न नयनानें ॥

तयां बघाया निर्मियलें मीं सूक्ष्म-दर्शिकेला ।
आणि निरखिलें पूर्ण तयानें सूक्ष्महि जन्तूला ॥

जरी झांकिलीं चर्मावरणें शरिरांतिल यन्त्रें ।
पाहियलीं तीं जिवन्त सारीं मीं 'क्ष' किरण मन्त्रें ॥

अनन्त योजन बोल दुरीचे पवना वदवीले ।
अशक्य गमलें निसर्गास जें करुन दाखवीलें ॥

मुठींत माझ्या अशी गवसतां प्रकृतिची काया ।
लीलेनें करकरां लागलों तिला वांकवाया ॥४४० ॥

नियम-बन्धनें नांव ऐकितां होतो सन्ताप ।
स्वैर जगीं मी बन्धन मजला गमतो अभिशाप ॥

या नियमांनीं खीळ घातली विश्वोत्कर्षांत ।
स्वातन्त्र्याच्या प्राणावरती केला आघात ॥

यास्तव बन्धन तोडायातें झटतों दिनरात ।
सदा चिरडतों टांचेखालीं नियमांचें भूत ॥

सजिव निखारा बान्धियला कधि कागदांत कोणी ।
मुक्त नरात्मा कसा रहावा बन्धनांत फसुनी ॥

नियम प्रीतिचा सुखशान्तीचा जन कल्याणाचा ।
एकच ठावा माझ्या जीवा समता-भावाचा ॥ ४५० ॥

* * *

दोष पाहुनी सृष्टीमाजीं प्रतिसृष्टी रचिली ।
माङ्गल्याची गङ्गा तींतुन अविरत वाहविली ॥

विधात्याहुनी श्रेष्ठ असें मी पहा मदिय सृष्टि ।
सत्याचा नित विजय जीमध्यें प्रेमाची वृष्टी ॥

न्यायाचा समतोल राहतो सदा इथें कांटा ।
सत्त्वांचे प्रासाद भव्यसे ध्येय राजवाटा ॥

प्राणांची पञ्चारति चाले त्यागच परिपाठ ।
उज्ज्वल मङ्गल सृष्टि करावी हृदयिं खूणगांठ ॥

शान्ति-समीरण इथें वाहती मन्द सुगन्धीत ।
क्रान्तीचा धुड्गाट चालतो स्वध्येय-धुन्दींत ॥ ४६० ॥

ज्वालामुखि तेजाळ उभाळति गगना भेदाया ।
सुधारसाचें सिञ्चन चाले दाह शान्तवाया ॥

शूर नायिका, नायक इथले सगळे धीमन्त ॥
औदार्याचें वैभव, इथलीं हृदयें श्रीमन्त ॥

भव्य वनश्री लताकुञ्जही मधु-पुष्पान्वीत ।
आत्मप्रकाशें वनें-उपवनें सर्व प्रकाशीत ॥

इथें शारदा नित्य छेडिते नादमधुर वीणा ।
भव-दुःखांची आग शान्तते श्रवुन ललित ताना ।

नद्या वाहती चैतन्याच्या घेउन पूरांना ।
वाचा फुटते जडाजडांना, गिरीकन्दरांना ॥ ४७० ॥

विसङ्गतीचा मालिन्याचा कुठें नसे ठाव ।
ब्रह्माच्या उफराट्या रीतिस इथें नसे वाव ॥

शान्तिसुखाचे वाहवितों मी अथाङ्गसे पाट ।
इथें थाटतों ऐश्वर्याचा नित्य नवा थाट ॥

सृष्टीस्तव साहित्य लागलें धात्याला चण्ड ।
आणि निर्मितों शुन्यांतुनही विराट ब्रह्माण्ड ॥

नाचवितों निष्प्राणा अर्पुन दिव्य चेतनाला ।
निसर्ग नमुनी ज्यास वाहतो सुमनांच्या माळा ॥

काळ वन्दितो विभूति इथल्या, अमर तीन काळीं ।
टीचभराच्या लेखनिचीही चतुराई सारी ॥ ४८० ॥

सृष्टि भासली अवजड गोणी जरी विधात्याला ।
सृष्टि परी मम तळहातावर करिते नव लीला ॥

सुटसुटीत प्रतिसृष्टी थिजला बघुन विश्वकर्मा ।
अन्त लाविला, ओळखिलें कुणिं मद्बुद्धीधर्मा ॥

**याज्ञवल्क्य मी, वाल्मिक, होमर, रविवर्मा, व्यास ।**
शोभविलें नवसृष्टि निर्मुनी तीन्ही लोकांस ॥

शब्दाङ्कित कधि सृष्टि रचितसें कधि चित्राङ्कीत ।
अस्फुट मनिंचे भाव रेखितों साध्या रेषेंत ॥

या सृष्टीला कुणी बोलती " हृदयाची हांक " ।
समर्थ सगळ्या संसाराची शमवाया भूक ॥ ४९० ॥

विदित मयसभा मयासुराची नाहीं कवणाला ।
देवेन्द्रादिक लोकहि सारा जिणें चकित केला ।।

**शेक्सपिअर, भवभूति, रवीन्द्रहि, गटे, कालिदास ।**
मीच असें, प्रतिसृष्टि विधाता मान्य विधात्यास ।।

निर्माया निज सृष्टि भूवरी सदैव स्वच्छन्दी ।
भल्या-भल्यांना छाती न मला करावया बन्दी ।।

**चौनृप**[1] फिरवी द्वाहीस, " जुन्या जाळुन ग्रन्थांस ।।
नवे लिहा **चौनाम** लिहूनी ग्रन्थारम्भास ।। "

स्वतन्त्रता अपहारक असल्या पाशवि हुकुमानें ।
प्रळय माण्डिला धरा निघाली धुऊन रक्तानें ।। ५०० ।।

सत्यासाठीं ध्येयासाठीं वरितों मृत्यूस ।
कोणाची मजपुढें चालणें कधीं न पत्रास ।।

---

१. **चौ नृपः**—चीनमधील चौ घराण्यांतील राजा. ख्रि. पू. २२१ या वर्षी चीनचा पहिला राजा म्हणून यानें द्वाही फिरविली. आणि शेतकी व शास्त्रीय पुस्तकें सोडून बाकी सर्व पुस्तकें जाळून टाकण्याचा हुकूम सोडला व चौनामानें प्रत्येक ग्रंथास आरंभ करून ग्रंथ लिहिण्याची आज्ञा दिली. परंतु जनतेनें ही आज्ञा अमान्य केल्यामुळें ४६० लोकांना त्यानें ठार मारिलें, कैकांना कठोर शिक्षा दिल्या व कितिकांना हद्दपार केलें.

# ४



चन्द्र सूर्य हे शान्तदान्त मम नेत्रच झवलाले ।
विश्वीं त्यांची सदासर्वदा उघडझांप चाले ।।
दिवस-रात्रिचा खेळ तयांचा सकलां सौख्याचा ।
परन्तु केला निशाचरांनीं दुरुपयोग त्यांचा ।।
मनांत येतां थोपवितों कधिं सूर्य उगवतांना[1] ।
थाम्बवितों कधिं निसर्गासही जातां जातांना ।।
यमापासुनी परत आणितों मृतशा जीवांना ।
आत्मार्पण मधु धुन्दित करितों अमर गीत-गाना ।। ५१० ।।
ब्रह्मा, विष्णू, महेश येतां माझ्या सदनाला[2] ।
" चला सतीचें सत्त्व हरूं, " या धरून हेतूला ।।

---

१. मांडव्य ऋषीच्या शापानें आपला पति सूर्य उगवतांच मरण पावणार म्हणून एका पतिव्रतेनें सूर्य उगवतांना थांबविला होता.

२. दत्त जन्माच्या प्रसंगास अनुलक्षून.

जळास सिञ्चुन तयांस दिधलें बाळरूप सान ।
प्रभाव बघतां सुटून गेलें त्यांचें अवसान ॥

न्हाणुन, भरवुन, खेळविलें मग मीं अङ्कावरती ।
खेळुन दमतां तयां गाइली अङ्गाई गीती ।

* * *

नेत्र उघडतां पेटतात तृण जगीं माजलेले ।
आणि खवळती असीम, सागर प्रशान्त निजलेले ॥

विश्व पोषितों, आग विझवितों सुधा वर्षवून ।
शृङ्गारीतों, कधीं जाळितों आग पाखडून ॥ ५२० ॥

आकाश-मुखा पहा उघडिलें ग्रासाया सारें ।
कैक लोपले मुखांत माझ्या धीर-वीर सारे ॥

कुणि श्वासाच्या झोतामध्यें नच वाचायाचा ।
वादळांत लव सांपडल्यावर सर्वनाश त्याचा ॥

आक्रोशत उच्छ्वासें वाहति वावटळी घोर ।
हांसडून गिरक्यांसह पाडिति वृक्ष महा थोर ॥

नव कोमांना नव आशांना दडपाया सजला ।
वावटळीनें उडवुन देतों ऐसा पाचोळा ॥

सौदामिनि नच, शुभ्र तीक्ष्णशा दांताची कान्ती ।
नाद करकरां गर्जे भेसुर त्रिलोक हादरती ॥ ५३० ॥

मेघान्धारीं चम्‌चम्‌ करिती विक्राळा दाढा ।
वाचाया विश्वास साङ्गती कर्माचा पाढा ॥

उष्ण श्वासांतून उफाळति ज्वालामुखि क्रूर ।
गगनस्पर्शी गिरिमालांचा हो चक्काचूर ॥

पाउस नच, या पडती गद्गद् हृदयींच्या धारा ।
उतरायाला दुभङ्गलेल्या सृष्टीचा पारा ॥

ज्ञानाच्या रूपास घेउनी व्यापुन विश्वाला ।
स्वयंप्रकाशें तेजोमय मी करितों सकलांला ।

सृष्टीच्या उत्पत्ति-लयाच्या पाठां देऊन ।
सत्य, सभ्यता, माङ्गल्याचें बोधितसें ज्ञान ॥ ५४० ॥

औदार्याच्या सुवर्ण किरिटा चढवित संसारा ।
देतों लुटवुन विज्ञानाच्या अखण्ड भाण्डारा ॥

* * *

परमेशानें कुणी दुज्यानें वेद न निर्मियले ।
मीच असें तो माझी वाणी वेदांतुन बोले ॥

कधि ग्रन्थांत्रें कौशल्याचें दिव्यरूप घेतों ।
विराटता मम असंख्य हस्तें जगास दाखवितों ॥

अनन्त शास्त्रीं अनन्त रूपें सदैव प्रगटून ।
सुखशान्ती अन् अपार वैभव देतों लुटवून ॥

सहस्रकर त्या वदा रवीला मला नसे खन्त ।
मत्कर कोणा नये मोजतां त्यांस नसे अन्त ॥ ५५० ॥

नाचतात नव कोटि रवींचीं करांत मम किरणें ।
तत्तेजानें दिपती भेकड जीवांचीं नयनें ॥

स्वार्थान्धा नच तसें मदान्धा दिसणें मद्रूप ।
बघूं न शकती कपटी, पापी, मज कामी भूप ॥

* * *

बर्फाच्छादित विशाल हिमनग वक्षाचा भाग ।
उठती मानस-सरोवराच्या लहरि सानुराग ॥
"सूर्य-कुण्ड",[१] मम हृदय उष्णसें वसतें या भागीं ।
ममतेची नित ऊब वाहते इथुन जागजागीं ॥
प्रशान्त शीतल इथें सदोदित तरङ्ग उठतात ।
क्रुद्ध प्रभञ्जन कधीं भयङ्कर नाचनाचतात ॥ ५६० ॥

उषा मङ्गला प्रथम वन्दिते आदरभावानें ।
आणि चढविते काञ्चन-किरिटा रोजच नेमानें ॥
सुन्दर पक्षी किलबिल करुनी, सुगान गातात ।
बिनधोक इथें सदा तपस्वी तप आचरितात ॥
आत्मानन्दीं तल्लिन होउन समाध कुणी घेती ।
नासाग्रीं नयनास लावुनी गूढ उकलताती ॥
कल्याणाचीं, उत्कर्षाचीं तत्त्वें शोधाया ।
कुणी हरपल्या शान्तिस येती येथें हुडकाया ॥
सृष्टीच्या हें धूलीपासुन असे अती उन्च ।
भेदाभेद न तयास शिवती विचारही नीच ॥ ५७० ॥

स्वर्ग-श्रेष्ठ अति उज्ज्वल निर्मल वक्ष महोदार ।
दया-शान्तिचे श्वास सोडितें पिऊन अङ्गार ॥

---

१. सूर्यकुण्डः—हिमालयावरील गरम पाण्याचा झरा.

अन्यायाचे उत्तुङ्ग गिरी येथें विरघळती ।
मालिन्याच्या माना येथें आपसया लवती ।।
प्रीति-रसाचे प्रस्रव येथुन सदा वाहतात ।
मानस-तरुच्या नव कोमांना प्रफुल्ल करितात ।।
इथून भागीरथी वाहते सुधेस घेऊन ।
अमर कराया मानवतेला शापा शमवून ।।
वाहवुनीया अथाङ्ग पाटा कोरडवाहूला ।
सुपीक करिते आणि निर्मिते रुचिर वनश्रीला ।। ५८०·।।
युगायुगाचे कळिकाळाचे लाटेसम हल्ले ।
आजवरी जरि अनन्त आले सर्व परतवीले ।
कळिकाळाशीं झुञ्ज झुञ्जतां डगली नच छाती ।
मी मी म्हणणाऱ्या कितिकांना फांकविली माती ।।
भीति इथें नच मालिन्याचे येती कधि वारे ।
येथिल पवनें पावन झाले तीन लोक सारे ।। ५८६ ।।

---





मृत्युलोक हें उदर असें मम कहर तयें केला ।
न्यायनीति ममतेला गिळिलें मानवधर्माला ।।
हृदयानें जरि प्रीतीचा बहु पुरस्कार केला ।
द्वेषाचा अति भयाण उदरें होम पेटवीला ।। ५९० ।।
उच्च कोटिला मानवतेला नेलें वक्षानें ।
विमल काय परि तिचा बनविला मलीन उदरानें ।।
सत्ययुगाला जन्म दिला जरि जगतीं वक्षानें ।
पाचारण कलियुगास दिधलें स्वार्थी उदरानें ।।
वक्षें देउन ऊब लाविलें सृष्टिस वाढीला ।
कीड विषारी परी लाविली उदरें प्रगतीला ।।
विज्ञानाच्या भाण्डारांतुन वीख काढियेलें ।
कौशल्याच्या कोठारांतुन शस्त्रा निर्मियलें ।

शास्त्रांमधुनी संहाराचें पिशाच जागविलें ।
वक्षाच्या सुरपुरींत उदरें नरका कालविलें ॥ ६०० ॥
वसुन्धरेच्या वसन्तोत्सवीं पेटविली आग ।
मङ्गल भालीं तिच्या लाविला रक्ताचा डाग ॥
लङ्केमधल्या स्वर्ण विटांची धूळधाण केली ।
हेम-द्वारका सर्व मङ्गला उदरें नाशियली ॥
सोमनाथ अन् विशाल वाडे खाईनें गिळिले ।
नामशेष किति सुवर्णमण्डित प्रासादहि झाले ॥
मानवतेच्या माङ्गल्याच्या भव्य स्मारकाला ।
आग लाविली कौशल्या अन् ज्ञानमन्दिराला ॥
देवासम या नरां लोटिले धुळींत अवमानें ।
मानवतेची मानखण्डना केली उदरानें ॥ ६१० ॥
सृष्टीचा उच्छाद माण्डिला असा तयें सारा ।
अन् शापांचा उगाच मिळतो काळाला मारा ॥
सर्व जाणती पुराणकालीं कथा वर्तलेली ।
चौदा रत्नें सागरांतुनी[1] जन्माला आलीं ॥
प्रसन्न होऊन अनन्त रत्नें ( ? ) उदरें निर्मियलीं ।
प्रेमभरानें सृष्टिस सारीं अर्पण मग केलीं ॥
खाण जशी, हीं रत्नें आलीं तशींच जन्माला ।
" भीक नको पण कुत्रा आवर ", मानव मग वदला ॥

---

१. देव व दानव यांनीं जेव्हां समुद्राचें मन्थन केलें त्या वेळीं समुद्रांतून चौदा रत्नें जन्माला आलीं.

सागररत्नें सृष्टि जाहली सुन्दर सम्पन्ना ।
तिची माण्डिली परि उदराच्या रत्नांनीं दैना ।। ६२० ।।

पाप, पिशुनता, अनय, कुटिलता, असत्य हीं रत्नें ।
उदरें देतां पचवीलीं मीं साधारण यत्नें ।।

हलाहलाहुनि अनन्तपटिनें तीव्र स्वार्थ वीष ।
भकास उदरें परी लाविलें निर्मुन वाढीस ।।

हलाहलाला पचवुन दिधलें सदा ढेकराला ।
तोल परी स्वार्थास पचवितां कधीं कधीं गेला ।।

जिथें जन्मलें हलाहलाहुनि वीख अती काळें ।
युगायुगाला विराट मानव जन्माला आले ।।

स्वार्थानें जरि त्यांवर अपुली जादू चालविली ।
विराट पुरुषांनीं परि त्यांची बाजू उलटविली ।। ६३० ।।

सागररत्नांनीं कधि अपुले बान्धव नच गिळिले ।
परि स्वार्थानें निजबन्धूंना नष्ट भ्रष्ट केलें ।।

देश, धर्म नच नातें गोतें उरलें स्वार्थाला ।
स्वार्थानें नर क्रूर पशु नव्हे — सैतानच बनला ।।

विश्वासघात, कपटाचरणहि त्यानें आचरिलें ।
संशय-भूतासाठीं कितिकां सुळीं बळी दिधले ।

स्वार्थ-होम अति भयाण येथें सदैव धगधगतो ।
पञ्चामृतें न नर-रक्ताच्या शान्त परी होतो ।

मानवजातीमधें निर्मिले पक्ष भेदभावें ।
श्रमजीवी अन् ऐतें खाऊ त्यांचीं हीं नांवें ।। ६४० ।।

कुणी बोलती गरीब एका दुज्यास श्रीमन्त ।
नम्र मनाचा एक असे अन् दुसरा उन्मत्त ।।

विश्व सुखास्तव जीवेंभावें अविरत झटणारा ।
धन-गवताच्या गञ्जीवरुनी दुजा भुङ्कणारा ।।

पवित्र-हृदयी सदासर्वदा सत्यच वदणारा ।
कपटी दुसरा नाना व्यसनीं निमग्न असणारा ।।

सत्त्वापुढतीं मातीसम धन एक मानणारा ।
देव मानुनी तयास दुसरा सदैव जपणारा ।।

या भेदानें धनवाले अन् श्रमजीवी दीन ।
हानीकारक असे निर्मिले जगतीं गट दोन ।। ६५० ।।

हक्क हिरावुन श्रमी जिवांचे नाना यत्नांनीं ।
निसर्गनिर्मित सम्पत्तीला हरिलें धनिकांनीं ।।

निजजन्मासह आणियली नच भूमि कुणीं सङ्गे ।
इतर जनांचा तिजवरचा मग हक्क कसा भङ्गे ? ।।

मानव मुकला मानवतेला तेंव्हांपासून ।
कलहाचे अन् काळे आले मेघ उफाळून ।।

* * *

अहम्पणाच्या नादीं लागुन केला नर हीन ।
हरिश्चन्द्र अन् पहा दुज्या त्या गोष्टी वाचून ।।

गुलामगिरीचा जन्म जाहला स्वार्थाच्या पोटीं ।
मानव विकला सदा नरानें भरलेल्या हाटीं ।। ६६० ।।
मिरवित होता देवपुजेचा टेम्भा धर्माचा ।
मेक्सिकोंत बाजार माण्डिला तयेंच निग्रोचा ।।
फ्रान्सामध्यें, युरोपभर मग पेठा हमखास ।
भव्य उघडल्या विकावयातें गुलाम सर्रास ।।
श्रीमन्तांस्तव थाटत होता अवघा बाजार ।
इशारतीवर नाचत होता त्यांच्या व्यापार ।।
हिंस्त्र पशूसम गरिबा होते गणित खरिददार ।
मुठभर लोकांसाठीं होता नाचत संसार ।।
समजत होता खरिदणार तो स्वतास मनिं राजा ।
गुलामास अन् लावित होता खडतरशा काजा ।। ६७० ।।
क्रूरपणाची फिरवित होता सुरी गळ्याभंवतीं ।
साङ्गत होता पशूप्रमाणें हक्क नरांवरती ।
कधिं घाण्याला, कधिं गाडीला तयांस जुम्पियलें ।
सान चुकीस्तव कठोर ऐशा शासनास दिधलें ।।
कधीं ठेविलें तिमिरीं कोण्डुन अन्न-जळावीण ।
फांसावर चढवुनी घेतले कितिकांचे प्राण ।।
कळसच होता अन्यायाचा अत्याचाराचा ।
नाद कोन्दला विश्वामाजीं हा:हा:काराचा ।।

१. गुलाम विकण्याच्या कार्यांत पाद्रीही भाग घेत होते. ही प्रथा फ्रा.. वगैरे देशांतहि होती.

उखडुन दिधला पाया क्रोधें मग गुलामगिरिचा।
सज्ज जाहलों घालाया अन् पाया प्रेमाचा॥ ६८०॥
[1]इंग्लण्डमध्यें प्रथम जागुनी प्रथा नष्ट केली।
पोर्तुगीज, डच, अमेरिकेनें साथ पुढें दिधली॥
असें मोडितां गुलामगिरिचें कम्बरडें कांहीं।
झटपट धनिकें निर्मियली मग सरञ्जामशाही॥
श्रमिकांवरती गाजविलें निज राज्य हिनें फार।
कोसळल्या शिरिं अन्यायाच्या वीजा अनिवार॥
असह्य झाला जेव्हां जेव्हां धनिकांचा मारा।
बदलाया जग धैर्यें सजलों फोडुनिया कारा॥
लोकमताचें जागवुनीया वादळ घनघोर।
सरञ्जाम-पद्धतीस दिधले धक्के चौफेर॥ ६९०॥
घाबरून यायोगें गेले धनाढ्य मग सारे।
करूं लागले नाना 'शाही' निर्मुनिया मारे॥
उत्तर दिधलें लोकशाहिच्या कुलपी गोळ्यानें।
बोथट केलीं त्यांचीं शस्त्रें अचूक मन्त्रानें॥

* * *

पशू खातसे पशूस, आणिक पक्षी पक्ष्याला।
ऐकिल्या न कार्धिं, कधीं पाहिल्या विपरित या लीला॥
जाती दिसते कधीं न अपुल्या जातिस पिळतांना॥
भाव दुजा कार्धिं त्यांच्यामध्यें दिसे न नयनांना॥

---

१. इंग्लण्डमध्यें ही प्रथा प्रथम नष्ट करण्यांत आली व मग ती डच, पोर्तुगीज, अमेरिकेंतही नष्ट झाली.

सर्वविनाशी स्वार्थाचा मनिं उपजतांच भाव ।
मानव सजला निज जातीवर करावया घात ॥ ७०० ॥

यापरि मनिंचे भाव बदलतां अनर्थ ओढवला ।
दुभङ्गली नरजाती, नुरला ठावहि दुःखाला ॥

नातेंगोतें विकूं लागलें मग पै-पैशाला ।
पावित्र्याचें मन्दिर बनली असुरांची शाळा ॥

जनावरांच्या प्राणाहुनही मानवप्राणांचें ।
मोल घसरलें, भाव वाढले आणि कातड्यांचे ॥

रवितापानें तापुन होतां शरीर मम काळें ।
अवमानुनिया मला बोलती "बनमाणुस काळें" ॥

काळेपण हें कसें लाभतें काय कारणानें ।
विचार कोणी परी न करिती खुल्या मानसानें ॥ ७१० ॥

प्रश्न तीव्रतर आणि उभविती काळ्या-गोऱ्यांचा ।
काळ्या रङ्गीं वदती लव नच ठाव सभ्यतेचा ॥

काळ्या रङ्गें प्रथम जगाला संसृतिचा साज— ।
दिला आणखी उत्कर्षाचा तुरा ऐटबाज ॥

काळयारङ्गीं अगणित भरले तारांचे पेव ।
काळ्या उदरांतुनी उगवतो भास्कर राजीव ॥

काळयारङ्गीं जन्मच उज्ज्वल हिऱ्यामाणकांचें ।
नेत्रावरती चर्म ओढितां कसें दिसायाचें ॥

* * *

जोंवरि रङ्गारङ्गाचा जगिं प्रश्नच धगधगणें ।
सुखशान्ती सम्वृद्धि कुणाला भूवर नच दिसणें ॥ ७२० ॥

मान मिळवितें खणखण वाजुन स्वार्थाचें नाणें ।
हृदय तिजोरींतील तोंवरीं ओस प्रीतिखाणें ॥

घोर बडविती डङ्का नौबति जगीं लाळ घोटे ।
कसें कळावें तोंवर जगता न्याय्य, खरें-खोटें ॥

समाजरचना विपरित रचुनी श्रमास नागविलें ।
दया, शान्ति, सद्भाव न हृदयीं परन्तु उद्भवले ॥

स्वार्थासाठीं लाभूं न दिलें कुणा शिक्षणाला ।
निसर्गाहुनी भयानक अशा रचिलें डावाला ॥

ज्ञानापासुन दूर ठेवुनी अफाट जनतेला ।
अज्ञान-तमीं चिरडुन दिधलें नरवांस नरडीला ॥ ७३० ॥

कुठें जन्मलों कुठें वाढलों कोण आइबाप ।
कळूं न दिधला कधीं जिवाला विश्वाचा व्याप ॥

विद्या-भवना भव्य लावुनी दिधलें कुलुपाला ।
सुवर्ण चावीविना उघडणें सहज न कवणाला ॥

अकिञ्चना मग कसा मिळावा लाभ शिक्षणाचा ।
खर्च सहावा कसा तयानें शुल्क पुस्तकांचा ॥

खायाला नच जिथें लाभतें तिथें शिक्षणाला ।
सम्पत्तीचा कसा मिळावा नद वाहविण्याला ।

दारिद्र्याचे कोट निर्मुनी अक्षय भंवतालीं ।
कैद्यासम श्रमविले उपाशी नित्य तीन कालीं ।। ७४० ।।

लाभूं न दिलें ज्ञान-प्रकाशा युक्ती-युक्तीनें ।
श्वास न पावन स्वातन्त्र्याच्या झाले पवनानें ।।

अज्ञानी यापरी बनविले गरीब दुबळ्याला ।
वरी "अडाणी" म्हणून उलटा हाणतात टोला ।।

*  *  *

कर्तव्याचा विसर पाडिला विश्वीं स्वार्थानें ।
पेटविलीं अन् ठायीं ठायीं द्वेषाचीं रानें ।

स्वार्थापायीं सृष्टित पडले खन्दक मोठाले ।
मांसानें निःस्वार्थ जिवांच्या पाहिजेत भरलें ।।

स्वार्थ काळिमा नरा लागला तया धुवायाला ।
अनन्त यज्ञें अनुष्ठानही हवें करायाला ।। ७५० ।।

कलङ्क वदतां वदतां त्यानें मानवता गिळिली ।
उज्ज्वलतेचीं, विशुद्धतेचीं तोण्डें काजळलीं ।

किती रक्तनिधि शुद्ध लागतिल स्वच्छ धुवायाला ।
ओल्या नर चर्माचें पुसणें हवें पुसायाला ।।

जर्जर-कीलित संस्कृति जीर्णा हवीच उजळाया ।
पुराण धुर्कट सडकीं मडकीं धुऊन तीं घ्याया ।

विराट तेजोवलयें सृष्टिस अवघ्या घेरून ।
हवीं पिशाचें जाळायातें तिमिरा नाशून ।

मानवतेची उज्ज्वल कान्ती अविरत पसरून ।
हवी कराया अमर धराही सुधा वर्षवून ।। ७६० ।।

प्रकाश, मङ्गल उषा हवी अन् चन्देरी दुनिया ।
निज प्राणांचीं फुलें तिच्यावर हवींत उधळाया ।।

अज्ञानाचा काळोखाचा नाश करायाते ।
निस्पृहतेनें स्वार्था सोडुन हवें धावयाते ।।

स्वातन्त्र्याचा स्वयम्प्रकाशी सूर्यहि डागळला ।
स्वार्थान्धारीं रातकिड्यांना ऊत घोर आला ।।

रातकिड्यांची भेसुर किरकिर येत जरी कानीं ।
चढावयाचें कांठा अजुनी तिमिराचें पाणी ।।

पूर्वेस रक्त डोम्ब आगिचा उठल्याविण काय ।
माङ्गल्याचा स्वातन्त्र्याचा दिसणें रविराय ।। ७७० ।।

तापविल्याविण कशी दुधाची लाभणार साय ।
प्रयत्न–सूर्योपासनिं गढला आज मनुज काय ।।

निज अस्थींच्या समिधा घेऊन होम पेटवून ।
नव तेजानें हवें सृष्टिला ध्याया उजळून ।।

स्वार्थ पिशुनता किडे जाळुनी, रक्षा घेऊन ।
खांचा खळगे सकळ तयानें घ्यावें बुजवून ।।

ध्येय वेदिवर हवें चढाया झणिं सरसावून ।
नरवीरांनीं निजप्राणांच्या चुडा पेटवून ।।

अन्यायाचा दौर्बल्याचा समन्ध जाळाया ।
प्राण-ज्योती-आग अखण्डित हवी पाखडाया ।। ७८० ।।

जळजळणारी काळी नागिण तत्फूत्काराला ।
शीतल जहरी लहर घेउनी चञ्चल बिजलीला ।।

तुटुन पडाया, हवें हराया दैन्य दीनतेचें ।
हवेंच जगतीं स्थापाया नवराज्य वसन्ताचें ।। ७८४ ।।

# ६



पाय राहती पाताळीं मम शेषाच्यापाशीं ।
बघून थरथर कांपतसे तो अजस्र पायाशीं ।।

पदें चालतां डगमग हाले पृथ्वी तत्शीर्षीं ।
खरत चालली कणाकणानें यास्तव प्रतिवर्षी ।।

पदाघात मम होतां घडतो घोर धरणिकम्प ।
हुङ्कारें अन् विश्वाअङ्गीं भरतो थरकांप ।।

काल शोभतो मच्चरणाच्या पावन धूलीनें ।
इतिहासाचें विभव वाढतें मत्पद-चिन्हानें ।।

अनन्त कालापासुन पृथ्वी घेउनिया डोईं ।
भुजङ्ग बसला, बघून त्याला हर्ष मनीं होई ।।

प्रेम तयाचें निष्ठा त्याची पृथ्वीच्या ठायीं ।
मनांत आदरभाव अतुल मम निपजवून देई ।।

कर्तव्यीं निज निमग्न न बघे दुजीकडे लवही ।
धरा रहावी सुखी सदोदित चिन्ता जणुं दाही ॥

कोण धरा ही, सर्प कोठला, नातें नसतांना ।
नवल वाटलें सृष्टीसाठीं सर्पा झुरतांना ॥ ८०० ॥

जातपात अन् रङ्गरूप नच प्रीतीला ठावें ।
प्रीति जाणते प्रीतीसाठीं प्रीतिरूप व्हावें ॥

प्रथम दर्शनीं डोङ्गर निर्जीव गमला उन्च मला ॥
शिखरावर शिरपेच भव्यसा भासे ठेवियला ॥

पूर्ण विरागी समाधिस्त त्या मूर्तीच्या देहीं ।
अलोट उज्ज्वल कान्ती दिसली दिपवी नेत्रांहीं ॥

अनन्त तेजोवलयें दिसलीं त्याच्या भंवतालीं ।
युगायुगाचीं तपतेजाचीं पुटेंच चढलेलीं ॥

* * *

ज्वालामुखि तेजाचा फुटला गमलें त्या ठायीं ।
मङ्गल तेजाविण नच दिसलें अन्य तिथें कांहीं ॥ ८१० ॥

विचार साङ्गे प्रकाश त्याच्या ध्येयनिष्ठतेचा ।
असेल सगळा माङ्गल्याचा अतुलनीय साचा ॥

बघुन जलांतिल भव्य मन्दिरीं धवल मुनीराया ।
आपोआपच शरिर वांकलें त्यातें वन्दाया ॥

थोपवून तों हांसुन वदला प्रेमानें शेष ।
" माणुसकी तर अजून आहे तुम्हांत अवशेष ॥

ऐकून कथा पृथ्वीवरल्या रोजरोज नाना ।
मला वाटलें मनुज पारखा झाला सत्त्वांना ॥ "

" माणुस सत्त्वा मानित असतां प्राणाहुनि प्रीय ।
मनांत आपुल्या शङ्का आली कां ही दहनीय ? " ॥ ८२० ॥

वदुनी इतकें बघून जर्जर काया सर्पाची ।
मनीं उपजली इच्छा कारण काय पुसायाची ॥

" तनू-यष्टि कां जीर्ण जाहली आणि अशी रोगी " ।
विचारणार न तोंच वदे तो मला कर्मयोगी ॥

" सर्व साङ्गतों बसा तुम्हांला, " वदला तो सर्प ।
सम्भाषणांत गर्वाचा मज आला परि दर्प ॥

" रोगानें नच चिन्तेनें परि तनू जीर्ण झाली "
वदतां, पुसिलें, " चिन्ता कसली जीवाला जाळी ॥

काय हरवलें, उणें वाटलें कसलें हृदयाला ।
किंवा जडता धरेंत आली भार तिचा झाला ! " ॥ ८३० ॥

" पृथ्वीचा नच भार आजवर झाला कधिंकाळीं ।
परी अतां ती निश्चित गमते भारभूत झाली " ॥

कारण यातें काय असावें पुसतां, कष्टानें ।
वदला, कथितों ऐका सारें प्रशान्त चित्तानें ॥

नक्तंदिनिं भूपृष्ठावरती पाप घोर वाढे ।
अन्यायाचे वेढ्यावरती चढती किति वेढे ॥

बळकट मूळावरी वाढलें धर्माचें वेड ।
विशाल वृक्षच झाला त्याचा अजस्रसा खोड ॥

घेर वाढला तयें रोधिलें ज्ञान-प्रकाशाला ।
कीड लाविली शान्तिसुखाच्या सुन्दर सदनाला ॥

झांकळून नरशक्ती जातां तीही डागळली ।
सहस्र वृश्चिक-दंशासम मज पीडा मनिं झाली ॥

ममतेच्या पोटांतहि शिरल्या शाखा विकराल ।
फळें लटकलीं नरमुण्डांचीं रक्ताङ्कित लाल ॥

छायेखालीं विराम घेती किति जम्बुक-व्याळ ।
धुमी लावुनी जगीं पसरिती दूहीचे ज्वाळ ॥

कुणी निर्मिती द्वेषाचे नग प्रचण्ड महाउग्र ।
नभ छेदाया बघती ज्याचे सदा तीव्र अग्र ॥

अन्यायाचें पेंवच फुटलें, धूरांचे लोट ।
नभा वेढुनी पाताळींही शिरू बघति थेट ॥

दाम्भिकतेची बुजबुजलेल्या अनीतिची घाण ।
जगीं कोन्दली जीव होतसे माझा हैराण ॥

दारिद्र्याचा घोर पेटला जिथें तिथें वणवा ।
व्यसन-धुरांचें वादळ उठलें गिळावया विजवा ॥

पुण्याचे भाण्डार फुटोनी, लोण्ढा पापाचा ।
वाहतसे नित फोफावत परि वीट न ये त्याचा ॥

मद, माया, मालिन्य माजलें कुजक्या कूपांत ।
असत्यता, आलस्यें केली नरावरी मात ॥

चिन्तानल हा उग्र वितळवी खडतर वज्राला ।
कसा टिकावा शुष्क त्यापुढें तनुचा पाचोळा ॥ ८६० ॥

स्वार्थ-विषाचे तुडुम्ब सागर अगणित निर्मियले ।
यानें तर मत्पाठीचेही कणे वांकवीले ॥

अमृत-निधिहुन भारभूत लव विषमय कासार ।
रुचला कैसा मानवास हा पाशवि विस्तार ? ॥

पृथ्वीचा नच भार परी या अनन्त रत्नांचा ।
असह्य झाला भार, बदलला नूरहि देहाचा ॥

सर्प-वचांना ऐकुन थिजलों मनांत वरमून ।
सत्य लपें कां ? जरी ठेविलें तयास झांकून ॥

धीर धरोनी हळूंच वदलों तोल सांवरून ।
"होईल खचित भार भूमिचा हलका येथून" ॥ ८७० ॥

वदुनी इतुकें नमस्कारुनी निघतां जायाला ।
पुन्हां घेतलें बसवुन त्यानें धरून हाताला ॥

वदला गालीं हांसत प्रेमें, कांहीं खोचून ।
उरास फुगवुन मानवतेला तुच्छच लेखून ॥

रसनाशक्ती अचाट, तुमचें वच कुलपी गोळे ।
निशाणबाजीवीण सकल हे फोलच परि सारे ॥

सद्बुद्धीची करुन खिरापत खळगी भरण्याला ।
विराट शक्ती पोटासाठीं विकली परक्याला ।।
मुठभर नर ते तुमच्यावरती सत्ता गाजविती ।
दास्यीं रुतला तरी न अजुनी बाहू फुरफुरती ।। ८८० ।।
यौवनांत वार्धक्य पातलें त्यजिलें ओजानें ।
तडफ न अङ्गीं उड्डाणें रवि गिळील त्वेषानें ।।
मानवदैना बघून कां नच चिन्ता वाटावी ।
माझ्याविण वसुधेची करुणा कोणाला यावी ।।
तत्कष्टानें हृदयिं पेटते दुःखाची आग ।
अतां मानवा विझवाया ती त्वरें जाग जाग ।। "
" घडामोड सृष्टीची बघतां इतुक्या आस्थेनें ।
नातेंगोतें काय तिच्याशीं वदा स्पष्टतेनें ।।
भार न होतो कसा तुम्हांला तिचा कधीं काळीं ? । "
प्रश्न टाकिला पन्नगास मीं सहजच त्या वेळीं ।। ८९० ।।
" भार भूमिचा ? छे ! छे ! भलतें वदूं नका कांहीं ।
कां आवडती वस्तू होते कुणा कष्टदायी ।।
कोप जाहला माझ्यावरती जेव्हां श्रेष्ठांचा ।
वांचविलें[१] मज हिनें देउनी आश्रय पोटाचा ।।
जन्मा आली अमुच्यासाठीं कष्टां सोसाया ।
तिच्या पदाशीं राहुं नये कां माझी नत काया ।।

पालन-पोषण निशिदिनिं करिते गोरगरीबांचें ।
उदरीं घेते सदैव पर्वत पापाशापांचे ॥

अनन्त वर्षांपासुन जडली हिजवरती माया ।
भारभूत होईल कशी मग तिची मृदुल काया ॥ ९०० ॥

सृष्टीवरती प्रळय माजतां भयाण मोठाले ।
तिनें मला अन् मींही तिजला सदैव वांचविलें ॥

तेव्हांपासुन तिचें मुलीसम पालन मीं केलें ।
अङ्गाखान्द्यावरी घेउनी तिला वाढविलें ॥

कवळ मुखींचे काढुनिया मीं सदा तिला दिधले ।
तिच्या सुखास्तव घोर अशा या तपा आचरीलें ॥

वसुन्धरा ही गमे सुन्दरा वागवितों डोईं
निज बाळाचा भार कधीं कां मातेला होई ॥

तिला मिळावें विपुल सौख्य हा धरुन मनीं हेत ।
जीवेंभावें सन्तत तिजला मी साम्भाळीत ॥ ९१० ॥

वैभवशिखरीं मोदभरानें नान्दावी बाळी ।
इच्छा मनिंची तुम्ही परी ती पूर्ण न कधिं केली ॥

कर्माधर्मा तुम्ही आपल्या ब्रीदाला मुकलां ।
स्वार्थापायीं सुख-स्वर्गाची वाट तुम्ही चुकलां ॥

* * *

सद्ध्येयाला औदासिन्यें ग्रासियलें पूर्ण ।
कर्तव्याच्या प्रासादाचा कळस होय चूर्ण ॥

स्वाभिमान मधुबाग तुडविली जाय पदाखालीं ।
डोळ्यांवरली दास्याची परि धुन्दी नच सरली ॥

प्रीतिराउळीं पहा उसळला आगीचा डोम्ब ।
जळून गेला उत्कर्षाचा विभवाचा कोम्ब ॥ ९२० ॥

सत्यपुरी उध्वस्त जाहली नुरतां कुणि वाली ।
अनाधिकारी राजा बनतां धरा दीन झाली ॥

दरिद्रता सम्राज्ञी झाली तुम्ही तिचे दास ।
माध्यान्हींच्या भ्रान्तीनें ये ग्लानी देहास ॥

ग्लानीचा घेऊन फायदा जुम्पुन घाण्याला ।
श्रम-घाम न हा, धनिक काढिती गरिबीच्या तेला ॥

तेलावर या चक्रें त्यांच्या फिरती यन्त्रांचीं ।
ओल्या हाडां भरडुन राशी उभविति पीठाची ॥

रोठ, ओतुनी घट्ट मांस-घृत खमङ्ग बनवीती ।
दीन जिवांच्या विचूर्ण आशा साखर मिसळीती ॥ ९३० ॥

कुस्करुनीया रक्त-क्षीरीं खाती आनन्दें ।
बैल-बोकडीं किती माजलीं ऐशा स्वच्छन्दें ॥

खाउन त्यांतील शितें, भुतें अन् पोषतात हत्ती ।
पायाखालीं उन्मत्तपणें कैकां चुरडीती ॥

माया-मदिरें डोळ्यांवरती नशा लाल बुन्द ।
स्वार्थ-तटाशीं निर्मुन केलें जगास आरुन्द ॥

प्रणयाचा नवरङ्ग गुलाबी पीउन आकण्ठ ।
नाचगान-रङ्गांस्तव दिसती सारे उत्कण्ठ ।।

गरिबांच्या गरिबीनें झाला धनिक धुन्दफुन्द ।
नाशाची ही आत्मघातकी चढली कां धुन्द ?" ।। १४० ।।

शेष थाम्बतां इथें तप्तसा सोडित सुस्कारा ।
कढल्या हृदया फोडुन गमला आला वाफारा ।।

शान्त कराया आग तयाची बोलणार कांहीं ।
क्रोधें होउन हिङ्गुळसा तो वदला लवलाही ।।

"वाचि वीर हो, पुरे, वल्गना करूं नका चण्ड ।
मुखवाफें कां कधीं पेटतो ज्वालामुखि थण्ड ।।

जिथें तिथें बेबन्दशाहि ही करित धुमाकूळ ।
चैतन्याचा जागृतिचा कां आला नच काळ ? ।।

खग्रासासम ग्रहण लागलें वैभवसूर्याला ।
ऐन दुपारीं दारिद्र्याचा चोर घरीं शिरला ।। १५० ।।

अमा विषमता वाढुं लागली प्रहराप्रहराला ।
हां हां म्हणतां तिनें गिळीलें शान्ती-चन्द्राला ।।

उद्भ्रान्तीनें विराट शक्ती गेली वेष्टून ।
राबवीत श्री सरस्वतीला बटकी बनवून ।।

चन्द्रसूर्य हे डोळे असतां दिसले कां नाहीं ।
योगेशाची अन्तरदृष्टी कुठें पेण्ड खाई ? ।। "

"अनन्तवीर्या पन्नगराया," वदलों मी त्याला।
"पुरे पुरे, हे बोल न भाले चिरिती हृदयाला॥

कुठें जन्मली जगीं विषमता, कुठें तिचें मूळ।
कशि दरिद्रता आली कोणीं माण्डियला खेळ॥ ९६० ॥

दिसतें सारें झोंप न आली कैफ न आफूचा।
चिन्ता सोडा काळ पातला आतां क्रान्तीचा॥

मानवजातींतील क्रूर ती जात मला ठावी।
पोषाखाला मी नच फसणें वचना मायावी॥

उक्ति, पन्नगा ! सत्यच माझी आपण मानावी।
स्थिती तयांची दाखवील झणीं काल तुम्हां भावी॥

त्या कामावर जातच असतां भेट अशी झाली।
साहस हंसलें मुदें चमकली आशेची बिजली"॥

उपहासात्मक हंसला ऐकुन पन्नग या बोला।
"किन्नर-नगरी पहा जरा मम" गर्वानें वदला॥ ९७० ॥

"अनीति, पातक, दरिद्रता नच दिसणें नयनाला।
समभावाचा प्रकाश सुन्दर इथें पसरलेला॥

तुम्हांसारिखे भेद न येथें, राज्य न अनयाचें।
दाम्भिकतेची सुरी फिरवुनी रक्त पिणारांचें॥

घराघरांतुन सुख-शान्तीच्या भरलेल्या पुञ्जी।
जेथें तेथें आनन्दाचीं उडतीं कारञ्जीं॥

नका ऐकवूं उगाच मजला बडेजाव त्यांचा ।
कपटानें संसार निघाला रङ्गुनिया ज्यांचा ॥
पालक आम्ही भूचे वदते तुमची जरि वाचा ।
शीर हलवितां कळेल तारक कोण खरा भूचा ॥ ९८० ॥
मी आहें म्हणुनी ही दिसते पृथ्वी नयनाला !"
सर्पाच्या या दर्पोक्तीनें क्रोध मला आला ॥
"भूमी माझी स्वतन्त्र न तिला लागे आधार ।
पहा, पन्नगा ! तिचा दावितों कोणावर भार ॥"
वदून इतुकें भूगोलावर आलों परतून ।
गुरुत्व-शक्ती धागेदोरे दिधले निर्मून ॥
त्याआधारें पृथ्वीगोला गरगर फिरवून ।
सर्पासह ती किन्नर-नगरी दिधली उलथून ॥ ९८८ ॥

---

# ७



अनल वर्षवी भास्कर निघते वसुधा भाजून ।
तापुन वारा, झळा वाहती अङ्गा चाटून ।।

लपते पळते छाया रविचें तेज न साहून ।
स्वेदकणांनीं तनू टवटवे पूर्णच न्हाऊन ।।

तेव्हां श्रमतों शेतामध्यें नाङ्गर टाकून ।
आशेचे अति उन्च मनोरे मनीं उभारून ।।

डोक्यावरती मेघ गर्जती कडाडते वीज ।
तरी उपसितों शेतामधलें सर्व कामकाज ।।

अवर्षणानें, पाउस करितो वर्षुन कधि घात ।
छळांत कां गरिबांच्या कोणीं धुऊं नये हात ।।

रज:कणांना परिश्रमांच्या भिजवुन घामानें ।
अर्ध-भुका राहून पेरितों जमीनींत दाणे ।।

कोमा जोमासितों घालुनी रक्ताचें पाणी ।।
अनन्त दाणे निपजवितों नित कणांकणांमधुनी ।।

उदक थण्डिनें गोठुन जातें रक्तहि गारठतें ।
दंवबिन्दूंनीं चिम्ब होउनी शरीर काकडतें ।।

दडून बसती पशुपक्षीही निज घरव्यांतून ।
राखण करितों तैं रात्रीच्या रात्री जागून ।।

प्रात:कालीं फुटे ताम्बडें जो नच आकाशीं ।
बैलाहुनिही अधिक राबतों जुम्पुन कामाशीं ।।

तुलना करितां कधीं कधीं मी माझी बैलांशीं ।
सहस्र पटिनें माझ्याहुन ते दिसति सुखी मजसी ।। १०१० ।।

श्रमून दमतां शिळ्या कोरड्या भाकरीस खातों ।
कोरड्यास नच मिळतां कवळां पाण्यासह गिळितों ।।

कधीं न मिळतां कुटका-भाकर उपाशीच निजतों ।
हरली भरली वसुधा बघुनी सन्तोषीं रमतों ।।

मुलें चिमुकलीं, भाउ-बायको, सारें घरदार ।
कष्ट उपसिती शेतामध्यें निशिदिनीं अनिवार ।।

पिकतां राशी धान्याच्या, किति मिळेल अपणाला ।
विचार असला कधीं न शिवतो माझ्या हृदयाला ।।

हिरव्या शेण्ड्यांतुनी कोंवळीं कणसें बाहेर ।
पडतां होतो सकल श्रमांचा माझ्या परिहार ।। १०२० ।'

वाऱ्यावरती नाचुं लागतां दौलत मोत्यांची ।।
धुमाकूळ हृदयांत घालिते लाटच मोदाची ।।

चाखित असतां फळें गोजिरीं श्रम-साफल्याचीं ।
मोद तुषारीं शमून जाते ज्वाला चिन्तेची ।।

मनांत म्हणतो घेउं सरी तिज, मुलां भीकबाळी ।
डोक्यासाठीं मुण्डासें अन् एक गाय काळी ।।

मधु स्वप्नांच्या रङ्गीं ऐशा रङ्गुनिया जातां ।
सुख तितुकेंही लाभुं न देती कुणि मदीय हाता ।।

स्वर्ण-कणांना बघून जमती पक्षी खादाड ।
धांवुन येती सगेसोयरे पसरुन भेकाड ।। १०३० ।।

सारा, बलुता कुणी मागती, कुणी दिढीकाढी ।
अन् धर्माच्या नांवाखालीं झोळी कुणि काढी ।।

साहुकारही येती अपुलें घेउन वहिखातें ।
सर्व भक्षुनी असतें ज्याचें सदैव पोट रितें ।।

पिढ्यामागुनी पिढ्या सम्पती देणें देतांना ।
खात्यांचें परि तोण्ड कधीं नच दिसतें बुजतांना ।।

मानव-उदरीं स्वार्थ जन्मला, स्वार्थोदरिं खातें ।
बीज-बियाणें जसें त्यापरी जन्मा फळ येतें ।।

कराळ काळाहुनी भयानक खात्याचें तोण्ड ।
गरिबांच्या संसारावरची हीच खरी धोण्ड ।। १०४० ।।

धोण्ड्याखालीं कितेक दबले नामशेष झाले ।
देशोधडिला किती लागले वंशहिं मोठाले ।।

देणें देतां या सर्वांचें होइ पुरेवाट ।
आणि शेवटीं हातीं उरतें भिक्षेचें ताट ।।

लुबाडून हे मला ठेविती कोठारें भरुनी ।
दुष्काळीं नच त्वरित काढिती विकावया म्हणुनी ।।

नफा मिळाया भावासाठीं बैसतात टपुनी ।
दैना केली धनिकवणिक या मुठभर लोकांनीं ।।

कष्टानें पिकवितों लुटोनी नेती हे चोर ।
कणाकणाला महाग होतों बनतों लाचार ।। १०५० ।।

गोजिरवाणीं बायापोरें अन्नास्तव रडती ।
अर्ध्यापोटीं झोंप न येतां निशिदिनिं तळमळती ।।

कर्ज फेडितों आयु-शक्ति-बल वेंचुनिया सारें ।
परी न विरतें श्रीमन्ताच्या कर्जांचें जाळें ।।

पिळून हृदया काढतात हे रक्ताची धार ।
आणि निर्मिती तींतुन नाजुक मदिरेची नार ।।

या नारीच्या नादें होतां नेत्र लाल बुन्द ।
योग्यायोग्य न दिसतें नयना, नुरती धरबन्ध ।।

कुणा छेडिती कुणा गाञ्जिती होउन मदमत्त ।
व्यसनीं झिञ्जुन करिती मञ्जुल बागा उध्वस्त ।। १०६० ।।

राज्य-हितास्तव भरबाजारीं अड्डे व्यसनांचे ।
जिकडे तिकडे बेत चालती नित संहाराचे ॥

न्याय तयां परिं सोडुन देतो शिक्षा नच देतां ।
दुःख होतसे यापरि व्यसना उत्तेजन बघतां ॥

नाचविती मम क्षुधा-सागरीं विलास-नौकांना ।
कुणी न झटतो परन्तु माझी हरावया दैना ॥

दारिद्र्याच्या उदरामाजीं जन्मतात पापें ।
तत्त्व त्रिकालाबाधित असतां, जाळितात शापें ॥

धनाढ्य धनि या दोषांचे, परि ठरतों मी चोर !
टकमक बघती सारे परि नच घेती कैवार ॥ १०७० ॥

खपतों श्रमतों कितीतरी मी त्यास नसे अन्त ।
पोटापुरतें कण न ठेवितां नेती श्रीमन्त ॥

कोठें भरुनी कुजत ठेविती धान्याच्या राशी ।
या चोरांना परी न देतो न्याय कधीं फाशीं ।

न्याय कोठला नीति कोठली कुठली ही रीत ।
न्याय-नीति सत्याचा दिवसा गळा दाबितात ॥

निर्माता जो ज्या वस्तूंचा मालक तो त्याचा ।
उमजुन नुमजे अर्थ कुणाला सरळ कायद्याचा ॥

न्याय-मन्दिरीं व्यसन रङ्गलें, न्यायाचें सोङ्ग ।
जो तो करितो जगशान्तीचें बेमालुम ढोङ्ग ॥ १०८० ॥

सतत साहतो अन्यायाचा असह्यसा मारा ।
शब्द काढितां एक मुखांतुन दावितात कारा ।।

बघूं न देती, लिहूं न देती, ऐकूं नच देती ।
मित्रासङ्गें हिरतां-फिरतां त्यांत आड येती ।।

अवमानुनिया ठोकरिती हे अर्ज विनन्त्यांना ।
यन्त्रगृहा नच काढूं देती, मोठ्या धन्द्यांना ।।

खुनी विचरती शिष्ठ म्हणुनिया उज्ज्वल माथ्यानें ।
सत्य-पूजकां परी लाभती सदा कैदखाने ।।

* * *

निजरक्तानें रङ्गविले जरि धनिकांचे वाडे ।
मला निजाया परी मिळाली धूल आणि रोडे ।। १०९० ।।

हृदय असें मज हवें वाटतें सुख-वैभव शान्त ।
दुःख-कष्ट परि दिलें जगानें वाढुन ताटांत ।।

कापुस निर्मुन मऊ बनविल्या जाडजूड गाद्या ।
जीर्ण घोङ्ङ्या परी मिळाल्या मजला नच साध्या ।।

कपडे दिधले जगा मखमली, मऊ रेशमांचे ।
वाळवून निजचर्म बनविले सुन्दर गालीचे ।।

धिण्डवडे जरि जगीं निघाले माझ्या अब्रूचे ।
परि न लाभलें धुडकें मजला इवलें चिन्धीचें ।।

अनेक सुन्दर धातु निर्मिल्या जगास भोगाया ।
परि न लाभलें सुधें मृत्तिकाभाजन जेवाया ।। ११०० ।।

कष्ट-जला सिञ्चुनी उभविलीं अफाट उद्यानें ।
गन्ध तेथला अल्प परी मी आजवरी नेणें ॥

थोर लाविल्या सुन्दर कोमल सुमनांच्या हारी ॥
परमेशा पूजाया पडलें पुष्प न परि पदरीं ।

नानारङ्गीं फळ-झाडांना वाढविलें भावें ।
स्वाद न नांवाविण जिव्हेला त्यांचा परि ठावें ॥

खन्त वाटली परी न याची अल्पहि हृदयाला ।
मधु वचनातें धनी बोलतां जीव सुखी झाला ॥

कष्टें पोटापुरतें मिळतां जीवन कण्ठीलें ।
सुखी देखुनी बान्धव त्यांतच सुख अपुलें गणिलें ॥ १११० ॥

व्यसनीं रमल्या श्रीमन्ता सुख माझें इतुकें ही ।
तीक्ष्ण शरासम खुपलें त्यांच्या रात्रंदिन देहीं ॥

* * *

श्रमतां श्रमतां जरी लाभली जीवा न उसन्त ।
रवितपनास्तव नसे साउली नसो, नसे खन्त ॥

हवा कराया माध्यान्हींचा शान्तच उदराग्नि ।
आणि प्यावया ओञ्जळ भरुनी थण्डगार पाणी ॥

दिलें न इतुकें माझी लुटिली कुटी चद्रमौळी ।
शेत हिरावुन गळ्यांत माझ्या अडकविली झोळी ॥

क्षुधानलानें पीडित जातां दारीं भिक्षेस ।
अधमांनीं मम अब्रूवरती केलें हल्ल्यास ॥ ११२० ॥

कपट ठेवुनी मनांत दिधलें सदैव दानाला ।
भिक्षेहुनिया मरण वाटलें बरवें जीवाला ॥

भिक्षापात्रा फेंकुन बनलों गिरण-कामगार ।
परी न झाला कधीं जरासा तळीराम गार ॥

खाया न तिथें नका विचारूं बाळांची दैना ।
व्याकुळल्याविण भूकेनें कधि सरल्या नच रैना ॥

अन्नच नसतां कुठुन फुटावा आईला पान्हा ।
भूक न शमतां कां न रडावा तळमळून तान्हा ॥

रडुनी रडुनी ग्लानी येतां चिमण्या जीवाला ।
केविलवाणीं कितेक पडलीं पसरुन चोंचीला ॥ ११३० ॥

जनसेवेचे फलक झळकती सदना-सदनाला ।
शहरोशहरीं त्यांचा झाला जरी बोलबाला ॥

परी न झाले कमी अल्पही गरिबांचे हाल ।
कशी कळावी धनशाहीची मायावी चाल ॥

या चालीनें घाव घातला समतेच्या पोटीं ।
रङ्कराव हा भेद निर्मिला विश्वाच्या हाटीं ।

वाड्यांतुन जरि धनिक राहिले झाला नच खेद ।
हृदयीं सलतो शल्यासम हा रङ्कराव भेद ॥

कलङ्कीत भेदानें केलें मानव-इतिहासा ।
विराटता धनिकास लाभली वस्तू उपहासा ॥ ११४० ॥

स्वर्ग-सुखांचा तेथें, येथें दुःखाची वसती ।
अजीर्ण होतें सन्तत, येथें भूकेची गस्ती ॥

नाच नाचती अप्सरा, इथें रोग धुमाकूळ ।
घालुन हरितो प्राण अकालीं, नित्याचा खेळ ॥

हंसति उपवनें तेथें, येथें सुमनें कोमजती ।
उन्मत्तांच्या पायदळीं किति चुरडुनिया जाती ॥

जग-सम्पत्तीवर हे बसले विळखा घालून ।
दुष्काळाची दारिद्र्याची फणा उभारून ॥

फणांतून फूत्कार विषांचे वाहतात लोकीं ।
पशूसारखा मानव भ्रमतो कुणी न अवलोकी ॥ ११५० ॥

* * *

सान जाहली विराटता जग-कल्याणासाठीं ।
युगायुगाला भार उचलिला कष्टांचा पाठीं ॥

पेटविली मज जाळायातें धनिकांनीं होळी ।
धनशाहीला भस्म कराया तीच परी सजली ॥

दारिद्र्याचें पाजियलें विष हृदया माराया ।
अमृत-सिन्धू त्यांत लाभला विश्वा ताराया ॥

**वेनभूप** तो[1] मदान्ध बनता लोळविलें त्यास ।
प्रजेस छळितां कंसाच्या मीं हरिलें प्राणास ॥

---

१. **वेनभूपतिः**–या राजानें प्रजेचा छळ मांडिला म्हणून प्रजेनें त्याचा खून केला.

आदिशक्ति **द्रौपदीस** छळितां राजमण्डपांत ।
अफाट राज्यासह मीं केला त्यांचा निःपात ॥ ११६० ॥

राजमदानें तुफान होता **पॉम्पी** नादान ।
**जुलियस् सीझरच्या** रूपानें हरिले तत्प्राण ॥

**अलेक्झाण्डर** दुसरा, तिसरा **पॉल भूप** यांनीं ।
त्रस्त प्रजेला करितां हरिलीं प्राणांचीं लेणीं ॥

जन हालांतें सीमा नुरतां ‘ जिजिया ’ करभारें ।
विनाशिलें जुलमास येउनी **शिवबा** अवतारें ॥

**वसिष्ट, गौतम, रामकृष्ण** मी मीच **धर्मराज** ।
**हरिश्चन्द्र, शिबि, बुद्धराज** मी मीच **ज्ञानराज** ॥

**लाल-बाल-पालांच्या**[1] रूपें जुलमा नाशाया ।
जन्मा आलों **गान्धी**रूपें सत्या रक्षाया ॥ ११७० ॥

जग कल्याणा **स्टॅलिन-लेनिन**, जे कोणी झटती ।
मीच, हुतात्मे जे वसुधेच्या शान्तीस्तव मरती ॥

भगिनी-पावित्र्या रक्षाया पुराण कालांत ।
सम्राटांना पदें चिरडलें माण्डुन कल्पान्त ॥

सुधारल्या कुणि युगांत दिसतां छळिता मातेला ।
**भंसाळीच्या** रूपें खडतर अन्नत्याग केला ॥

---

१ लाल-बाल-पालः–लाल म्हणजे लाला लजपतराय, बाल म्हणजे बाळ गंगाधर टिळक व पाल म्हणजे बिपिनचन्द्र पाल.

बोथट केली युगायुगाचीं जहालशीं शस्त्रें ।
वांकविलें मीं भल्याभल्यांना सत्याग्रह-अस्त्रें ॥

तत्त्वासाठीं यमासवें मी झुञ्ज झुञ्जणारा ।
न्यायासाठीं प्रेमें बन्दीवास भोगणारा ॥ ११८० ॥

सत्याच्या मी विजयासाठीं प्रळय माण्डणारा ।
सत्त्वाच्या साम्राज्यासाठीं अन्न त्यागणारा ॥

जुलमावरती बन्दूकीचे बार झाडणारा ।
चिर शान्तीस्तव निज रक्ताचा सडा टाकणारा ॥

प्राण रोमरोमांत जागती तीक्ष्ण जणूं भाले ।
कुठवर जगणें माझ्यापुढतीं जुलमांचे चाळे ॥

भूमातेच्या कण्ठामधला मीच खरा साज ।
मद्वचनावर सम्राटांचा नाचतसे ताज ॥





धरा आणि मानवता जेव्हां नागवली गेली ।
निकर्टि ठेपला विनाश ऐशी शङ्का मनिं आली ॥

संसृति झाली रोगग्रस्त अन् किलकिलीत जीर्ण ।
रक्त विषारी वाहुं लागलें नसेनसेंतून ॥

या रक्ताची धुन्दी चढतां नर राक्षस बनले ।
करूं लागले आणि अमानुष सदाकदा चाळे ॥

खाम्ब पेटुनी अष्ट दिशांचें सत्य.सभ्यतेचे ।
जळूं लागलें मानवतेचे मन्दिर मोलाचे ॥

दारिद्र्याच्या जाळीमध्यें स्वाभिमान सिंह ।
जखडुन झाला दास्य-शरानें छिन्नभिन्न देह ॥

क्रोधें तेव्हां लाल जाहले डोळे अङ्गार ।
शिजूं लागलें रक्त अन्तरीं फुटोनिया ऊर ॥

हृदयांतुन चिरकाळच्या अगणित लालभडक थोर ।
सूडभाव घेऊन उडाल्या जगतीं चौफेर ।।

धरा माखली रक्तें तेव्हां शुचिर्भूत झाली ।
आणि पसरली माङ्गल्याची विश्वावर लाली ।।

नव्या मनूचा नव्या युगाचा उषःकाल आला ।
सुख-शान्तीचा स्वातन्त्र्याचा सूर्योदय झाला ।।

कुशी बदलतां जराशीच ही वसुधा हादरली ।
उन्मत्तांच्या मनोरथांचीं चाकें डगमगलीं ।।

जागृत नयनें बघूं लागतां भूवरच्या लीला ।
वसुधा दिसली मुदित मनानें सज्ज स्वागताला ।। १२१० ।।

तिमिर कापुनी चढूं लागली पूर्वेला लाली ।
उजळुं लागली तेजानें नव वसुन्धरा न्हाली ।।

हांजी-हांजीखोरपणाचें थाम्बवुनी गान ।
घेउं लागले भाटहि गगनीं क्रान्तीची तान ।।

चराचरांतुन होउं लागलें गान स्वागताला ।
धडकी भरली दिवाभितांच्या उलव्या हृदयाला ।।

तोफांचा गडगडाट झाला साथ करायाला ।
बडवुं लागले निनाद त्याचे गगन ढोलकाला ।।

गर्जुं लागल्या दिग्गज-घण्टा भैरवसा नाद ।
फुटुन मिसळला नर-कवटींचा त्यांत शङ्खनाद ।। १२२० ।।

तोडा सम्पुन वैषम्याचा मावळला शाप ।
कालाच्या पाठीवर पडली समतेची थाप ।।

* * *

उत्क्रान्तीच्या वैभवशाली रथास घेऊन ।
त्याग धुरन्धर अबलक वाजी तयास जुम्पून ।।

सद्भावांचा चाबुक सुन्दर सप् सप् उडवून ।
जागवीत भरधांव निघालों मढ्यांतहि प्राण ।।

वज्रांच्या टापांनीं दिधले प्रान्त दणाणून ।
चिर शान्तीची धवल पताका दिली उभारून ।।

युगें युगें जी विराट शक्ती विस्खळीत झाली ।
त्यांच्या सजलों सङ्घटनेला या झेंडयाखालीं ।। १२३० ।।

वित्त-मदान्धा, सत्ताधीशा स्पष्ट आणि कथिलें ।
रात्र सम्पली दिवस अतां हे जागृतिचे आले ।।

शासाया मज उपाय जितुके आजवरी केले ।
माझ्या तेजापुढें परी ते सर्व फोल ठरले ।।

विद्रोही मज गणुन निर्मिल्या पोलादी कारा ।
सदनासम त्या, गमल्या शीतल वीजेच्या तारा ।।

दण्डाया मज विस्फोटात्मक प्रचण्ड जरि तोफा ।
आत्मिक-शक्तीपुढें तयांचा थण्डगार ताफा ।।

पाषाणासम बोथट झाल्या खड्गांच्या धारा ।
सुमवर्षासम कोमल गमला गोळ्यांचा मारा ।। १२४० ।।

प्रचण्ड झाली पहा जगाच्या विचारांत क्रान्ती ।
अतां न मिळणें सुखमदिरा अन् तुम्हाप्रती शान्ती ।।

मानव रक्षक असतां बनला भक्षक प्राणांचे ।
न्यायाच्या नांवानें वळिता दोरच फासाचे ।।

ऐश्वर्याचें सम्पत्तीचें दिलें तुम्हां राज्य ।
ज्यांच्या शक्तीवरती टिकतें तुमचें साम्राज्य ।।

ज्यांच्या रक्तामुळेंच उडती विलास-कारञ्जीं ।
पदें तुडवितां जीवन, त्यांची लुटोनिया पुञ्जी ।।

न्याय कोठला नीति कोठली कुठली ही रीत ।
अतां जागलां जरी न तुमचें ठरलें अनहीत ।। १२५० ।।

कर्मा धर्मा तुम्ही विसरलां मार्गाला चुकलां ।
बनतां व्यसनाधीन बुद्धिचा तोल असा गेला ।।

पिकवाया निज पोळी ज्यांच्या पेटवितां सदना ।
सत्तेच्या चक्रांत भरडितां क्रूरपणें ज्यांना ।।

त्यांच्या हृदयांतून उफाळति ज्वाळ प्रळयाचे ।
झळाळ त्यांचे गिळूं पाहती सिंहासन तुमचें ।।

तुम्हां घेरिलें आज तयांच्या अश्रू-मेघांनीं ।
धुन्दकारल्या दिशा म्हणुनि कां दिसे न नयनांनीं ।।

युगायुगाचे जर्जरपीडित श्वास कोण्डलेले ।
मुक्त जाहले वादळरूपें घोङ्घावत सुटले ।। १२६० ।।

बलाढ्य त्यांची आत्मिक-शक्ती-वीज कडाडोनी ।
तुटूं पाहते तुमच्यावरती दाही बाजूंनीं ॥

युगायुगाचें तिमिर सांचलें तुमच्या हृदयांत ।
कळूं न दे हें, बघूं न दे जरि घडतो कल्पान्त ॥

सडूं लागली सद्बुद्धि, तमीं गटङ्गळ्या खात ।
उत्क्रान्तीच्या दिव्य प्रकाशें उजळा हृत्प्रान्त ॥

राबविण्याला समर्थ न तुम्ही द्रव्य-शासनाला ।
तयार व्हा झणिं ज्यांचें त्यांच्या स्वाधिन करण्याला ॥

विलासभवना सोडुन उतरा जीवनकलहांत ।
जागुन मानवकल्याणास्तव झटा अविश्रान्त ॥ १२७० ॥

सम्पत्तीचा साम्राज्याचा सोडुनिया तोरा ।
रङ्गभेदहि जा विसरोनी काळा अन् गोरा ॥

कर्म आचरा फुलेल ज्यानें विश्वाची बाग ।
विस्मरतां हें जगीं विषमता भडकवील आग ॥

या आगीनें जळून जाइल वैभवसुख सारें ।
आणि नाचतिल स्वैरपणानें प्रळयाचे वारे ॥

प्रळयाशीं कां निमन्त्रणाला देतां निज हातें ।
निजकर्म-कर्दमांत बान्धितां स्वीय समाधीतें ॥

युगें युगें यापरी सुधेचा पाजियला प्याला ।
पालट अल्प न परी विलासी हृदयिं घडुन आला ॥ १२८० ॥

* * *

अन्यायाच्या जुलमांच्या अन् अत्याचारांच्या ।
चक्रीं भरडुन विचूर्ण होती अस्थी नित ज्यांच्या ।।

वीरत्वपूर्ण या विश्वीं झालें ज्यां दुःसह जीणें ।
दुःखद गमलें दासासम निज घरांतही फिरणें ।।

निर्मियले रक्तानें ज्यांच्या वाडे मोठाले ।
विश्वसुखास्तव दारिद्र्यानल प्रेमानें प्याले ।।

ज्यांच्या मरणांतून जगाला यशोलाभ झाले ।
त्यांना कथिलें, "उठा अतां हे पुरे पुरे चाळे ।।

ज्यांच्या सौख्यासाठीं अपुलें रक्त तुम्हीं दिधलें ।
भयाण त्यांनीं विणिलें तुमच्या नाशाचें जाळें ।। १२९० ।।

उपभोगूं नच देती तुमचें तुम्हां प्रती सूख ।
नागवूनिया वाढविती नित दुःखावर दुःख ।। "

वेळोवेळीं कानिंकपाळीं बोल असे वदतां ।
खडबडुनिया जागी झाली विराट मानवता ।।

करुणामय निज दशा पाहुनी झाला सन्ताप ।
ताण बैसुनी कुठें वाढला मेन्दूचा ताप ।।

श्रमी जिवांचे, निर्दोष्यांचे देखुनिया हाल ।
पारा चढला, आणि बिघडला मेन्दूचा तोल ।।

साम्राज्याची विशाल तृष्णा शब्दांचें जाल ।
बघुन भडकले शिरेशिरेंतुन आगीचे लोळ ।। १३०० ।।

तद्वाफेनें उडूं लागलें ऊर धाडधाड ।
उच्छ्वासांचे गोळा झाले मेघ सडेतोड ।।

कडकडली यांतुन असभ्यता-तिरस्कार वीज ।
शान्त मनींहि तिनें निर्मिला आगीचा साज ।।

अपमानाचें ज्वालाग्राही लाभतांच तेल ।
प्रशान्त सागर खवळुन उठले ज्वालावर ज्वाल ।

लोळ तयांचे क्षुधानलानें जळत्या हृदयाला ।
येउन मिळतां, संहारानल भडकुनिया गेला ।।

सुमनांत कुठें ज्वाळ भडकले, रेशमांत वीज ।
विश्व-तनूवर तळपत दिसला प्रळयाचा साज ।। १३१० ।।

उदरीं, हृदयीं, कुठें मस्तकीं आग भडकलेली ।
विराट मानवता मज दिसली पूर्ण पेटलेली ।।

सङ्घटीत या होतां दिसल्या ज्वाला लीलेनें ।
प्रळय तयांतून घोर मातला जळलीं उद्यानें ।।

अमङ्गलाचें अशुद्धतेचें जळूनिया भूत ।
सूर्य, चन्द्र, भूगोल निघाला होउनिया पूत ।।

नव्या युगाची नव्या मनूची वाजवीत मुरली ।
सत्चित् सुन्दर वसुन्धरा मग आनन्दें रचिली ।।

* * *

विराट मानवतेला बघुनी आणि आज त्रस्त ।
एकत्रित मीं अनन्त केले धगधगते पोत ।। १३२० ।।

महानलें या जाळायातें विश्वाला सजता ।
कर्णपटावर " थाम्बा " आला स्वर हा ओझरता ॥

" या आगीनें भस्मिभूत जग होइल ", कुणि वदलें ।
" जाणतसें मी, नको साङ्गणें ", उत्तर त्यां दिधलें ॥

सप्तताल मग पेटवून मीं दिधलें पोतांनीं ।
सप्तसागरीं वडवानल तो दिला चेतवोनी ॥

अतां रडोनी काय होतसे बोटें मोडून ।
निजकर्म-फळा ज्यानें त्यानें घ्यावें भोगून ॥

कळे जाळिते आग, परी ती शुद्ध वस्तुजात ।
करिते, पावन सुवर्णासहि जाळुन भट्टींत ॥ १३३० ॥

जागविला प्रळयाग्नि, आज ही म्हणून रणदेवी ।
सत्चित् सुन्दर करावया भू आणि काळ भावी ॥

विश्रांति